परम पूज्य मातोश्री

# गं. भा. राधाबाई भटे

यांचे चरणीं अर्पण.



आई,—

तूंच लावलेल्या या झाडाला आलेलं हें फूल अर्थात् तुझ्या चरणा-शिवाय दुसरीकडे कुठं वाहूं ?

तुझी

शालिनी



# ओळख

स्त्रीस्वातंत्र्य, समानहक्क, स्त्रीशिक्षण आणि संततिनियमन या मताच्या या लेखिका असून त्यांच्या लेखनांत याविषयींचा ऊहापोह केलेला आढळून येईल. स्त्रियांच्या सामाजिक जिवनांतील बारीकसारीक प्रश्नांचा विचार त्यांच्या लेखणीच्या द्वारें प्रगट केला जातो. स्त्रियांची बाजू त्या सडेतोडपणें व मार्मिकतेनें मांडतात. वाचनाचा त्यांचा व्यासंग दांडगा असून, त्या कलेच्या फार भोक्त्या आहेत. हौसेखातर त्यांनीं नाटकांतून व सिनेमांतून कामें केलीं आहेत. तसेंच त्या संगीताच्या उपासक आहेत. त्या स्वतः सुंदर गातात व विशेषतः स्वतः रचलेलीं पदें गाण्यांतच त्यांना आनंद वाटतो. मुंबईच्या 'निर्भीड' साप्ताहिकांतून ' गरीब बिचारी गोगलगाय ' व पुण्याच्या ' तेज ' दैनिकांतून ' विस्कटलेला संसार ' अशा त्यांच्या दोन कादंबऱ्या क्रमशः प्रसिद्ध झाल्या आहेत. त्यांनीं ' भक्तिपुष्पमाला ' म्हणून एक छोटंसं पुस्तक लिहिलं आहे. मौज, किरण, सत्यकथा, निर्भीड, उदय वगैरे साप्ताहिकांतून व मासिकांतून त्यांचे लेख आले आहेत. त्यांच्या लेखनाचा रोख व स्त्रीजिवनचित्रें वाचकांस 'लपलेले गुन्हेगार' या प्रस्तुत कादंबरींत वाचावयास मिळतील.

प्रकाशक

# निवेदन



माझा निवडक लघुकथांचा व काव्यांचा संग्रह प्रसिद्ध करावा, असें मला फार दिवसांपासून वाटत होतं. पण तो सुयोग कादंबरीच्या रूपानें आला. अथवा ज्याप्रमाणें नद्या संथपणें वहात, नागमोडी वळणें घेत, आपल्या प्रियकराच्या— सागराच्या भेटीला जातात, त्याचप्रमाणें इतक्या अवधिनें कां होईना पण घडवून आणला त्याबद्दल ‘ उदय ’ मासिकाचे संपादक श्री. ज. ग. कांबळे यांची मी आभारी आहे. माझ्या संकल्पाप्रमाणें ( सत्य संकल्पाचा दाता परमेश्वर) हें माझं ‘बोबडें’ पुष्प जनतेपुढें सादर करितांना मला निरातिशय आनंद होत आहे. हें माझं पुष्प सुजन गोड मानून घेतील अशी मला आशा आहे.

आतां ज्यांनीं मला गद्यवाङ्मयांत पदार्पण करायला लावलें, ते माझे परममित्र श्री. रमाकांत वेलदे हे होत. त्यांनींच सर्वस्वीं श्रम घेऊन ‘विस्कटलेला संसार’ ही सामाजिक कादंबरी तेजमधून प्रसिद्ध केली. मला प्रथमपासून काव्याची आवड फार, पण काव्याचे विचार सुसंगत जुळवून त्याची मांडणी गद्यांत कशी करावी हा कादंबरीचा आराखडा माझे जुने मित्र श्री. ना. वि. कुलकर्णी यांनीं दिला आणि या सर्वांवर सुवर्णकळस चढविणारे माझे धर्मबंधु निर्भीडकार श्री. अ. ह. गद्रे यांनीं हें घरांत रांगत असलेलें मूल जनतेपुढें आज चालावयास लावलं. जनतेनं हे माझे बोबडे बोल गोड मानून घ्यावेत अशी आशा आहे.

शालिनीनिवास, ५०९ बुधवार, पुणें. —लेखिका

# प्रस्तावना.

कांहीं दिवसांखालीं मी हैद्राबादेहून पुण्यास आल्यावेळीं आकस्मिक कारणानें या कादंबरीलेखिकेचा परिचय झाला. समाजाचे सद्यस्थितिवर वाद चालू असतां प्रस्तुत लेखिकेनें आपले कांहीं विचार प्रकट केले. ते सुसंगत विचार ऐकून मनाला विशेष जिज्ञासा, सदर लेखिकेबद्दल माहिती मिळण्याकरितां, उत्पन्न झाली. शोधाअंतीं असें समजलें कीं, यापूर्वी यांच्या काहीं कादंबऱ्या वर्तमानपत्रांतून संगतवार प्रसिद्ध झाल्या आहेत व कांहीं खर्डे तयार आहेत. त्यासंबंधीं इच्छा प्रकट करितां, प्रस्तुत कादंबरीचा खरडा पहावयास मिळाला. मीं सर्व कथानक सावकाश व काळजीपूर्वक वाचून पाहिलें. व चौकशीअंतीं असें समजलें कीं, हें कथानक काल्पनिक नसून, घडलेली, वस्तुस्थितिनिदर्शक हकिकत आहे. ही हकिकत व्यवस्थित साकल्यरूपानें मांडतांना जी विचारांची साखळी जोडली ती समाजानें विचार करण्यासारखी आहे. नेहमीं रोज वावरतांना उठतां बसतां साहाजिक ज्या गोष्टी घडतात, त्या, अवडंबर न माजवितां किंवा आलंकारिक भाषा न वापरतां मांडल्यास त्यांचा समाजाचे मनावर तात्कालिक परिणाम होतो व प्रकट केलेले विचार पटतात. या दृष्टीनें पाहिल्यास हें सर्व कथानक फार परिणामकारक झालें आहे. वर्णनाची शैली व स्पष्ट विचारांतील निर्भीडपणा यामुळें वाचकवर्गाचें मन आकर्षिलें जातें व समाज साधकबाधक बाजूंनीं विचार करावयास लागतो. हिंदूसमाजांतील एक हृदयस्पर्शी चित्र डोळ्यांपुढें उभें राहतें व या प्रयत्नाबद्दल कौतुक करावेंसें वाटल्याखेरीज राहात नाहीं. समाजांतील पुरुषांचीं मनें विकारवश असल्यामुळें कर्तव्याची दिशाभूल होऊन धुक्यांत सांपडल्याप्रमाणें स्त्रीसमाजावर त्यांच्या मर्जीविरुद्ध जुलूम होतो. वैयक्तिक मताचा बेजबाबदार धुरळा चढून न्यायबुद्धि नष्ट होते. यांत पुरुषवर्गावर वेळोवेळीं जी सडेतोड टीका आहे व पुरुषवर्गाच्या

लब्धप्रतिष्ठितपणा बाहेर काढला आहे, तो वस्तुस्थितिनिदर्शक असल्यामुळें टीकास्त्राचे घाव सहन केल्याखेरीज कांहीं गत्यंतर नाहीं व विचारवंतांना सदरी लिखाणाचे विचाराबद्दल सहमत व्हावें लागतें. पान ४ वरील ' एकदां पतिपत्नी या नात्यानें वागावयाचें कबूल केल्यावर मग जगाची भीति कां बाळगावयाची?' वास्तविक-पाहता यांत गैर काय आहे ? व धार्मिक बंधनाला आळा न बसतां समाजाला आपली वर्तणूक सुधारण्याचा सात्त्विक मार्ग मोकळा आहे. अशा रीतीनें समाजाची वर्तणूक वाईट न होतां दिवसेंदिवस चांगली होण्याचा संभव आहे? त्याचप्रमाणें " एखादी स्त्री नोकरी करूं लागली कीं, तिजविषयीं नानातऱ्हेचे संशय घ्यावयाचे; स्त्रियांचे बाबतींत होणाऱ्या अन्यायाचें चित्र कोणाला दिसत नाहीं. उलट त्याकडे जाणून बुजून डोळेझाक केली जाते. निराधार अबलांच्या-कडे एकाच दृष्टीनें पाहून हे संभावित नराधम साळसूदपणें जगांत वावरत असतात. आणि त्यांच्या या कृष्णकृत्याकडे समाज डोळे-झाक करितो!" काय ही समाजाची वस्तुस्थिति नाहीं ? समाजानें कधीं यासंबंधी विचार केला आहे काय ? हे विचार संकटांत सांपडलेल्या एका अबलेचे आहेत व सदरहु लेखिकेनें स्पष्ट व निर्भीडपणें एका अबलेच्या तोंडीं घालून पुरुषवर्गास आवाहन केलें आहे. यावरून समाजानें अवश्य विचार करून असल्या लब्ध-प्रतिष्ठांना खड्यासारखें वेंचून त्यांचें माप त्यांच्या पदरांत घालावें व या विचाराबद्दल लेखिकेस धन्यवाद द्यावे. प्रत्येकाला आपलें कर्तव्य व जबाबदारी विसरून चालणार नाहीं. " पुरुषांच्या मोहजाळांत सांपडून कित्येक स्त्रिया पतित झाल्या आहेत व कित्ये-कांचे आयुष्याची राखरांगोळी जाहली आहे." अशी वस्तुस्थिति नाहीं काय? " यावर समाजानें काय केलें ? समाज राहो, आप्तेष्टांनीं काय केलें ? त्यांनींसुद्धा हेटाळणीच केली. मग टीचभर पोटासाठीं वाम-मार्गाचा अवलंब केला तर कोणती अशी वाईट गोष्ट जाहली ? समाज हा मृदंगाप्रमाणें दोन्हीकडून आवाज काढतो." इतक्या निर्भीडपणें विचार मांडल्याबद्दल लेखिकेस धन्यवाद दिल्याखेरीज

समाज राहणार नाहीं. माझ्या मतें पुस्तकांतील वेळोवेळीं जी विचारसरणी मांडून पुरुषवर्गावर जे कोरडे ओढले आहेत, त्याबद्दल वाईट वाटून न देतां वर्तन सुधारण्याकडे लक्ष दिल्यास स्त्रीवर्गाचें कल्याण होणार आहे. वास्तविक स्त्रियांचें चांगलें किंवा वाईट चारित्र्य होण्यास बहुतांशीं पुरुषच कारणीभूत होतो. जसजसा स्त्रीसमाज सुशिक्षित होईल तसा पुरुषवर्गाच्या अनैतिक वर्तनाला आळा बसेल व उभयतांचें कल्याण होईल. वाचकवर्गानें सहृदयपणें सर्व कथानक व विचार वाचून पाहिल्यास लेखिकेला अंशतः धन्यवाद दिल्याखेरीज राहणार नाहीं. प्रत्येक गोष्टीच्या दोन बाजू असतात, त्याकडे जरी दृष्टि दिली, तरी वाचकवर्ग सदर विचारास चिकटून राहील व सदर लेखिकेचे परिश्रम कारणीं लागून समाजास एक प्रकारचा धडा दिल्याचें श्रेय मिळेल. सदर विचारांची साखळी बरीच लांबली व असेंच लिहीत गेल्यास बरीच लांबण्याचा संभव आहे. वाचकवर्गास लांबलेली प्रस्तावना वाचण्याचे श्रम होऊं नयेत म्हणून लेखणीला येथेंच विराम देतों.

मु. पुणें<br>ता. ७ जून १९४१

अंबादास गोविंदराव मुखेडकर,<br>ॲडव्होकेट<br>जामबाग, हैद्राबाद (दक्षिण)

# लपलेले गुन्हेगार!

## १

सुंदर गुलाबाच्या ताटव्याजवळ एक वीस बावीस वर्षांची तरुणी गेंदबाज गुलाबाचें फूल हातांत घेऊन चबुतऱ्यावर आपल्याच मनाशीं एकटीच विचार करीत बसली होती. तोंडांतल्या तोंडांत पुटपुटणं चाललं होतं पण तें विचाराच्या भरांत स्पष्ट ऐकूं येत होतं. " खरंच, हें फूल किती सुंदर आहे? पण कांहीं वेळानें याच्या पाकळ्या गळून हें पायदळींच पडणार ना? " आणखी कांहीं वेळ थांबून, ती शून्य दृष्टीनें गुलाबाच्या ताटव्याकडे पाहूं लागली. इतक्यांत तिला कुणीतरी हांक मारल्याचा भास झाला. तिनें इकडे तिकडे पाहिलें तर कुणीच नव्हतं. ती पुन्हां पहिल्याप्रमाणें विचार करूं लागली.

मधूनमधून तिचे निराशेचे उसासे ऐकूं येत होते. एकंदरींत तिच्या हालचालीवरून तिचें आयुष्य बऱ्याच दुःखाच्या प्रवाहांतून

गेलें असावें व त्यांतून चालतांना तिच्या पायाला बरेच काटेकुटे मोडले असावे असं वाटत होतं. तिनें जवळच ठेवलेल्या बॅगमधून एक मोठंसं कागदाचं पुडकं काढलं, व त्यांतलीं कांहीं पानें ती चाळूं लागली. नंतर तिनें कांहींतरी वाचण्यास सुरवात केली.

" मनुष्याच्या कल्पनेप्रमाणें आयुष्यांतील सुखसाधनें कधीं कुणास सांगतां आलीं आहेत का ? संसारांतील आशा–निराशेच्या नौका समुद्रांत एकट्याच भटकत असतात. कोणत्याही भलेबुरेपणाची त्यांना कदर नसते. समुद्रलाटांच्या तडाख्यांतून निसटण्याचा प्रयत्न करीत आहेत, तोंच वीज चमकावी व लगेच मावळावी, त्याचप्रमाणें सभोंवतीं सर्वत्र काळोख पसरलेल्या अंतःकरणांत आत्मविश्वासानें सत्याचा विचार करावा व त्या मार्गांत अकाळविकाळ पिशाच्चानें मनाला भिववावें, असें नेहमीं चालतें. "

" सविते,

माझं अपरिचित आणि पुष्कळ दिवसांनीं आलेलं अनपेक्षित पत्र पाहून तुला आश्चर्य वाटेल; पण त्यांत विशेष असं कांहींच नाहीं. समाजांत सुगंधी पुष्पांची पायदळीं पडून माती होते. तद्वतच सुंदर स्त्रियांची या समाजरूपी राक्षसांच्या राक्षसी इच्छेला बळी पडून शेवटीं त्यांची वाईट स्थिति होते. हेंच चित्र मीं या तुजकडे पाठविलेल्या पुडक्यांत रेखाटलें आहे. तें मी माझ्या जीवनाच्या नाशानंतर तुला, तुझ्या आप्तस्वकीयांना व समाजांतील समंजस भगिनींना कांहींतरी मार्गदर्शक व्हावं म्हणून प्रसिद्धीकरतां तुजकडे पाठवीत आहे. हें माझं जीवनेतिहास लिहिलेलं पुडकं तुझ्या हातीं पडेल त्याच्या आधींच माझा आत्मा इहलोक सोडून गेला असेल."

या दोन ओळी वाचतांच सवितेला रडूं कोसळलें. बऱ्याच वेळानें दुःख ओसरल्यावर तिनें आपले डोळे पुसले व आकाशाकडे पहात ती म्हणाली, ' आपल्या मित्र–मैत्रिणीची शेवटची इच्छा पुरविणं हें मित्र–कर्तव्य आहे. तसं न केलं तर तो कृतघ्नपणाच होय. बाकी सुलभा फार गोड स्वभावाची मुलगी. आम्हीं शाळेंत

असतांना एकदां मी फार आजारी पडलें होतें, म्हणून मला घरीं पोंचविण्यांत आलें. तीहि माझ्याबरोबर आली. तिनें माझी उत्तम तऱ्हेनें शुश्रूषा केली. अगदीं आईच्या ममतेनें केली. तेव्हांपासून आमच्या घरांत ती सर्वांना आवडूं लागली. पुढें तिनें खाजगी हॉस्पिटलमध्यें मेडिकल कोर्स घेतला व ती तिथेंच रहायला गेली. सुलभा ही ब्राम्हणाची, सुस्वभावी, मोठ्या दर्जाच्या कुटुंबांत वाढलेली मुलगी, पण बिचारी अगदींच भाबडी, त्याचमुळें ती जगांत फसली. तिची हकिकत ती आमच्याकडे होती तेव्हांच तिच्याकडून आम्हांला समजली. तिच्या अतिशय उदास चेहऱ्यावरून ती दुःखानें फार दडपली गेली असावी असं वाटत होतं. पण थोड्याच दिवसांत आमच्या घरामध्यें ती प्रफुल्ल अंतःकरणानें रंगूं लागली. मीं तिला एकदां विचारलं, सुलभा, तुझी खरीखुरी हकीकत सांगशील का ? तेव्हां ती चटकन् म्हणाली, " माणसाच्या मरणानंतरच त्याच्या घाणेरड्या आयुष्याचा स्फोट व्हावा... " असें म्हणून ती चटकन् निघून गेली.

मनुष्याच्या सुंदर जीविताचा शेवटीं असा घात व्हावा ना ? खरंच, सुलभेसारख्या कित्येक स्त्रियांच्या आहुतीच्या ज्वाला व करुण किंकाळ्या, परमेश्वरा ! अजून तुला ऐकूं येत नाहीं का ?'

सवितेनें कितीतरी वेळ आपलं तोंड दोन्ही हातांनीं झांकून घेतलं. इतक्यांत तिच्यामागें कुणी तरी आल्याचा भास झाला. हा भास खरा होता. बाबासाहेबच आले होते. बाबासाहेबांनीं सवितेकडे पहात आश्चर्यानें विचारलें, " हें काय सविते ! तुझ्या डोळ्यांत अश्रु ! आणि ते कां ? आणि हें कागदाचं पुडकं कुणाचं ? "

बाबासाहेबांनीं तें कागदी पुडकं उचलून पाहिलें, त्यावर एक पत्र होतं. तें पत्र त्यांनीं पूर्ण न वाचतां खालील नांवाकडे पाहून ते म्हणाले, " काय, सुलभेचें पत्र ? काय म्हणते ? कुठं असते ती ? '

" कुठं आहे ती बाबा ? या विषारी समाजाला कंटाळून सुलभा परलोकीं गेली ! " सवितेनें निराशेनें उत्तर दिले.

" काय, सुलभा मेली ? आत्महत्त्या केली तिनं ! अरेरे ! फार गोड स्वभावाची मुलगी होती. " बाबासाहेब विव्हळून म्हणाले.

" काय म्हणतां बाबा ! मुलगी होती ? म्हणजे मेल्यानंतर मुलगी पण जिवंत असतांना तुमचे विषारी जहरी नेत्र तिच्याकडे लागलेच होते ना ? या जगांत जिवंतपणीं न्याय कधींच मिळणार नाही. मेल्यानंतर त्या प्रेताचं स्वागत करणं, त्याला फुलं वहाणं, त्याची मिरवणूक काढणं हें ढोंग आमच्या समाजाला बरं साधलं आहे. बाबा, आपल्या छापखान्यांत हा सुलभेचा जीवनेतिहास, तिचं हें आयुष्य छापून प्रसिद्ध करा, म्हणजे तरी सुलभेचा मृतात्मा तुमच्या झालेल्या जहरी पापाबद्दल क्षमा करील. हीच तुम्हांला माझी विनंति आहे. मनुष्याच्या आयुष्यांतील चित्रविचित्र अनुभव, ते देखावे कधीं कुणाला सांगतां येतील का ?

\+ + + +

आज कित्येक दिवसांत सवितेला शांत झोंप कशी ती आलीच नव्हती. आजच्या चर्येवरून कुठला तरी जडभार खालीं झाल्याचा स्पष्ट दिसत होता. ती आपल्या दिवाणखान्यांत पलंगावर एका सुंदर तऱ्हेनें बाइंडिंग केलेल्या पुस्तकाचीं कांही पानें चाळीत पडली होती. तोंच तिला निद्राभगिनीनें मिठी मारली. चैत्र महिन्याचे दिवस असल्यामुळें तिनें आपल्या उशागतीची खिडकी उघडीच ठेविली होती. रात्रभर तिला चांगलीं झोंप लागली. सकाळीं सूर्याची कोंवळीं कोंवळीं किरणें तिच्या काळ्याभोर केसांना चमकवीत होती. सकाळीं मंद सुटणारा वारा तिच्या शरिराभोंवती सारखा घोंटाळत होता. ती मधेंच जागी होई व फिरून झोंपे. थोड्या वेळानंतर रस्त्यावरून जाणारांची पादत्राणें व त्यांच्यातील कुजबूज सारखी ऐकूं येत होती. त्यांतील कांहीं शब्द स्पष्टपणें तिच्या कानावर पडले.

" एका गरीब पण कुलीन बाईनें आपल्या आयुष्यांतील भलेबुरे प्रसंग रेखाटलेत त्यांत. "

" अरे, पण हें सगळं खरं कशावरून ? "

" असं वाटतं बुवा, आणि समाजांत असं होत नसेल कशा-वरून ? सगळेच कांहीं तुझ्यासारखे हरिदास नाहींत. तें कांहीं असो. मला फार आवडली बुवा ती कादंबरी. मी माझ्या विधवा बहि-णीला ' भेट ' म्हणून पाठविणार आहें. "

" म्हणूनच दोन पुस्तकें घेतलींस वाटतं; आणि प्रकाशक कोण आहे ? सुनीता सरदारकन्या ना ? आजन्म ब्रह्मचारी ! ह ऽ ह ऽ "

कुजबूज सारखी ऐकूं येत होती. तीमुळें ती संपूर्ण जागी झाली. ती उठून उभी राहिली व खिडकीवाटे तोंड बाहेर काढून पाहूं लागली. तिनें सभोंवार नजर फेकली. तिची नजर समोरच्या मोगऱ्याच्या ताटव्यावर खिळून राहिली. ताटव्यावरील मोगऱ्याचीं फुलें पूर्ण विकसलेलीं तिला दिसलीं. तिचं मन मोगऱ्याच्या फुला-सारखं प्रफुल्लित झालं. तिनें आनंदातिशयानें गिरकी मारली, व पलंगाखालीं उडी टाकली. " सुलभेच्या ऋणांतून मी आज मुक्त झालें. मित्रकर्तव्य म्हणून मीं आपलें कर्तव्य पार पाडलें." तिच्या चेहेऱ्यावर आनंदाचा हंसरा गुलाब नाचत होता. तिनें उशा-खालील पुस्तक काढून उत्सुकतेनें त्याच्यावर आपली गोंडस नाजूक बोटं फिरवून तें हृदयाशीं घट्ट धरलें. ' गडे सुलभा, तुझी इच्छा पूर्ण केल्याबद्दल मला गोडसं आलिंगन दे ! ' असें म्हणून तिनें डोळे मिटले. तोंच ' चहा आणूं का बाईसाहेब ? ' असे गड्याचे शब्द तिच्या कानीं आले. ' जा, घेऊन ये. ' असें म्हणून ती प्रातर्विधीस गेली. लवकरच टॉवेलनें हात पुशीत ती टेबलापाशीं येऊन थडकली. चहा उभ्या उभ्या संपवूनच तिनें पुस्तक हातांत घेतलें व वाचावयास सुरवात केली.

"माझी ही चिमुकली उडी समाजाच्या अंतर्भागावर मी टाकीत आहे. माझी ही जीवन–नौका समाजाच्या चक्रव्यूहांतून कसकशी गेली, हें दृश्य मी येथें दाखवीत आहें. पण तें समाजाला पटेल

कीं नाहीं, याची मला शंका वाटते. कदाचित् अनेक स्त्रियांना पटेल अगर पटणारही नाहीं. जीव, आयुष्यांतील दिवसामागून दिवस, क्षणामागून क्षण, मार्ग क्रमीत आहे, पण सत्याचा विचार करावा तर असत्याचा काळोख दिसूं लागतो. त्या काळोखांतून मी जात असतां मला एक सतेज दिवा दिसला, आणि माझ्या जीवनांत आशेचा अंकुर फुटुन उदयभानु वर येऊं लागला. तोंच माझ्या दैवानें घाला घालून अक्राळविक्राळ जबड्यांत माझा तो दिवा गडप केला. झालं. सगळीकडे अंधारीअंधार झाला ! भयंकर काळोख ! त्यांतून मी माझा मार्ग आक्रमूं लागलें. खूप खूप कांटे टोंचले. ठेंचा लागल्या. बऱ्याच ठिकाणीं ठेंचाळून पडलें सुद्धां ! कटु अनुभवाचे घुटके घेत घेत अगदीं एकटी एकटी जात होतें मी. माझे सारे कटु अनुभव मी आतां समाजापुढें मांडणार आहें. ते वाचून माझ्या समदुःखी भगिनींना दुःख होईल ! पण त्यास नाइलाज आहे माझा.

" माझ्या उभ्या आयुष्यांत माझ्यावर प्रेम करणारं मला कुणीच आढळलं नाहीं. दुःख सांगावं जगाला म्हणजे मनाला थोडें तरी सुख होतें. एकमेकांजवळ आपलें अंतःकरण मोकळें करून सांगण्यांतच खरं सुख आहे. अंतःकरणाला होत असलेल्या यातना थोड्या तरी कमी होतात. प्रीतिदेवतेचा मजवर कोपच होता. माझ्या आयुष्यांत असे कांहीं चमत्कारिक प्रसंग घडले आहेत कीं ते सांगणं म्हणजे निर्लज्जपणाचा कळसच केल्यासारखं होईल. एकदा का स्त्रियांचं वाकडं पाऊल पडलं, मग तें चुकीनें असो कीं परिस्थितीनें असो, त्याचा फायदा स्त्रीउपासकांनीं, कामुक पुरुषांनी घेतलाच म्हणून समजा : देवाच्या नांवावर पुजाऱ्यानं सुग्रास अन्न खावं प्रसाद म्हणून, पण प्रसादाच्या नांवावर तो स्वतः पोसला जातो आहे हें कुठं तो सांगतो. त्याचप्रमाणें समाजांत मोठे प्रतिष्ठित म्हणून मिरवणारे, स्त्रीउद्धारक म्हणून गाजणारे सारे ढोंगी आहेत ! माझं जीवनचित्र जेव्हां जेव्हां मी डोळ्यापुढें

आणतें, तेव्हां माझं तें जीवित किती हिडिस वाटतं मला ! माझा मलाच राग येतो ! पण काय करूं ?

"मनुष्य हा एक प्रवासी आहे. प्रवास करतां करतां त्याला एक राजवाडा दिसला. तो राजवाड्यांत गेला. त्याला तेथील सौंदर्य, ऐश्वर्य,संपत्ति, तेथील राजविलास त्याच्या दृष्टीस पडले.तो पुढें प्रवास करूं लागला. त्याला पुढें एक स्फटिकासारखा पाण्याचा झरा झुळझुळ वहात असलेला दिसला. त्यांत कबुतरांची क्रीडा चालली आहे, सभोंवतीं सृष्टिदेवीनें आपलें सौंदर्य पसरविलें आहे, फळा-फुलांनीं सारी सृष्टि नटलेली आहे, असं हें नयनमोहक दृश्य त्याला तेथें दिसलं.

" असं सुखाचं, गमतीचं आयुष्य मी कंठीत होतें, पण मी एकदम कोठेंच्या कोठेंच जाऊन आदळलें ! मला जखम झाली, ती जखम मी कधीं कधीं उकलून पहातें तों तें किळसवाणें दृश्य : पहावंसं सुद्धां वाटत नाहीं.

" मनुष्याच्या आयुष्याला सुरवात झाली कीं त्याचं सुरवातीचं आयुष्य मोठं मजेंच, सुखाचं असतं. पण—

" मी माझ्या जीवनांतील सांगत असलेले कटु अनुभव माझ्या खोल अंतःकरणांतून बाहेर पडत आहेत. मी माझा जीवनइतिहास सांगत असतांना मन कसं अगदीं चलबिचल होतं. काय उपयोग होणार आहे दुसऱ्याला सांगून ! अशा विचाराच्या भरात मन कसं अगदीं गोंधळून जातं. माझ्या आयुष्याला इतकीं नागमोडी वळणं आहेत कीं, त्यामुळें जगांत जगणं मला अशक्य होऊन बसलें आहे. तरुण स्त्रियांच्या आयुष्यांत कोणत्या वेळीं काय प्रसंग येईल, त्याचा परिणाम काय होईल याचा नेम नाहीं. ज्याच्याशीं आपले जीविताचे ऋणानुबंध येतील त्यांच्यापासून आपल्या जीविताचें संरक्षण करणेंच कठीण. पुरुषाशिवाय स्त्रियांचं जीवन नीरस आहे, हें अगदीं जरी खरें असलें; पण पुरुष स्त्रीस जर आपलं अर्ध अंग मानील तरच. पुरुष सदानकदा स्त्रीच्या संगमसुखांत सौख्य मानणारे नसले तरच हें खरं मानणं योग्य ठरेल. स्त्रीच्या कल्पनेची, तिच्या

कार्याची, तिच्या ध्येयाची जर पुरुष योग्य जोपासना करील, तर पत्नीपासून मिळणाऱ्या सुखास तो योग्य ठरेल. पत्नी, प्रणयिनी आणि माता यांचं विलक्षण मिश्रण स्त्रींत सामावलेलें आहे. त्याचा विचार न करतां पुरुष जर अंगांत असलेलं थोडंफार शौर्य घरांतल्या बायकोवर लाथाबुक्क्यांनीं दर्शवूं लागले, तर हे भागुबाई पुरुष साऱ्याच सुखाला मुकले असें मानावयास हरकत नाहीं. मग अवदसा घरांत येते व लक्ष्मी घराबाहेर जाते.

" आयुष्यांतील पहिली चूक मनुष्याला सबंध जन्मभर भोगावी लागते, म्हणूनच शेवटीं त्याला आपल्या तळमळणाऱ्या आत्म्याचा उद्धार करण्यासाठीं हें जग सोडून जाणं भाग येतं. तो जग सोडून जाण्यास सज्ज झाला तर त्यांत नवल कोणतें ? दैव फिरलं म्हणजे अंबऋषीच्यापाठी लागलेल्या सुदर्शनानें त्यांना त्राहि भगवन् करून सोडलें, तर माझ्यासारख्या अभागिनीची दशा कशी आणि कोण चुकविणार ? अशा परिस्थितींत जगण्यांत तरी काय अर्थ आहे ? म्हणूनच मी हें जग सोडण्यास तयार झालें. या जगांत चाललेल्या संभावित सोदेगिरीचा व त्यांच्या लपलेल्या गुन्हेगारीचा मला फार वीट आला आहे. मी जेव्हां स्वतः स्त्रीजातीबद्दल विचार करतें तेव्हां मला चोहोंकडून ऐकूं येऊं लागतं कीं ' स्त्री ही मोहिनी आहे, ती आपलं मोहजाल पसरून पुरुषांना रावाचा रंक करते, ' असे अनेक तऱ्हेचे आरोप समाजांतून स्त्रियांवर केले जातात. 'स्त्रीमुळें पुरुषांचा अधःपात होतो' पण माझ्या मतें हा अधःपात पुरुष आपल्या हातांनीं आपल्याकडे ओढून घेतात आणि त्यांत त्यांचें स्वतःचें व त्याच्याबरोबर स्त्रियांचें अधःपतन झालेलें आढळतें. पण अशा पुरुषांना समाजांत मानमरातब मिळतो व स्त्रियांना मात्र शेलक्या शब्दांचा मार खावा लागतो. व्यभिचारी, डाकिणी, पापिणी, कुलकलंकिता, विश्वासघातकी, असे अनेक किताब तिला देण्यांत येतात. ही जाणीव स्त्रियांना व्हावी याच हेतूनें माझ्या आयुष्याचे गोफ कसकसे तुटले गेले, हें मी समग्र तुला येथें सांगत आहें. सविते, मी अगदीं ईश्वरसाक्ष सांगतें, मी या राक्षसी जगांत

इच्छा नसतांना जगलें. तें कां म्हणशील, तर मी कशीतरी माता झालें होतें. मातेची भूमिका फार निराळी असते. ईश्वरानें दिलेल्या मातृत्वाच्या पदवीस स्मरून, मातृकर्तव्याच्या जाणिवेनं माझं उभं आयुष्य मी कसंबसं काढलं व त्यामुळें मी दुसऱ्या अनेक प्रेम-मोहांतून अलगत सुटलें. कर्तव्याच्या आड नेहमीं मोह येत असतो, पण मीं त्याला जुमानलं नाहीं; त्याची पर्वा केली नाहीं. पण शेवटीं देवानं दिलेलं हें मातृपद त्याला सुद्धां देखवलं नाहीं. त्यानें सुद्धां मला थोड्या दिवसांतच पोरकं केलं. माझ्या हृदयांतली प्रकाशज्योत विझून गेली. त्या ठिकाणीं अंधकार झाला.

"पुत्रशोकानें मातेचं मन किती विव्हल होतं, हें माता झालेल्या भगिनीशिवाय कुणालाच समजणार नाहीं. गेलीं पंधरा वर्षें मीं कशीं काढलीं हें मलाच ठाऊक. कांहीं दिवस राजवाडीस राहून समाजाचा डोळा चुकविण्याकरितां मी भावनगरीस रहात असे. एवढ्या अवधींत मी दोन मुलांची आई झालें होतें. मी, माझे पति व माझीं मुलं कांहीं दिवस एकत्र रहात होतों. हृदयांतील गूढ व पवित्र भावना उच्चारण्यास व हृदय मोकळें करण्यास मला कधींच संधि मिळाली नाहीं. माझे शिक्षणाबद्दलचे विचार नष्ट झाल्यामुळें माझें मन निराश झालें होतें. त्याला कारण असत्याचा सहवास मला नकोसा होई. पहिल्यापासून मला कलेचा नाद, पण तोही पुरा झाला नाहीं. देशसेवेंत मला आनंद वाटत असे, पण तोही आनंद मला मारावा लागला. समाजकार्याची मला फार हौस होती, पण तीही साध्य झाली नाहीं. लेखन-कार्याची हौस अतिशय. मीं खूप खूप पुस्तकें वाचलीं. मीं बरंचसं लिहूनही ठेवलं होतं. पण तें मला समाजापुढें मांडतां आलं नाहीं. मी डोळे असून आंधळी होतें, कान असून बहिरी होतें, हात असून थोटी होतें. मला कांहींसुद्धां करतां आलं नाहीं. आपण स्वतंत्र व्हावं असं मला फार वाटे. मी पुष्कळ विचार करी. पण माझ्या या स्वतंत्र वागणुकीच्या विचाराला कोणी तरी विरोध करणारें होतेंच. विरोधकांचा स्वार्थी स्वभाव मला तसें करूं देत

नसे. त्यांच्या या स्वभावामुळें मी फार कंटाळलें होतें. पण मुलें पोसण्याच्या जबाबदारीमुळें मी त्यांच्याजवळ कसेबसे दिवस काढीत होतें. पुत्रशोकाच्या भयाण दुःखानें दिवस कंठीत होतें. अशा परिस्थितींत त्यांच्या भीषण स्वभावाचें चित्र माझ्या डोळ्यासमोर स्पष्ट दिसूं लागलें. त्यांनीं मला पहिल्याच वेळीं औषध घेण्याचा सल्ला दिला होता. तो मीं जुमानला नाहीं. नंतर मुलगी टाकून देण्याबाबत निरनिराळ्या तऱ्हेनें सांगून पाहिलें. पण मीं कशासही जुमानलें नाहीं. त्यांना जगांत दिवस काढायचे होते. पण मुलाचा लबदा नको होता. पण माझ्या बाबतींत कांहींच नाहीं का? मला माता होण्याची हौस नव्हती का? मला सुद्धां जगांत दिवस काढायचे होते. माझ्यामुळें त्यांच्या नांवाला काळिमा लागणार होता, हेंच खरं. पण एकदां पति-पत्नी या नात्यानें या जगांत वागायचं कबूल केल्यावर मग जगाची भीति कां बाळगायची? माझे त्यांनीं खूप हाल केले. मी अर्धपोटीं राहिलें आणि शेवटपर्यंत मीं माझे मातृपद राखण्याचा प्रयत्न केला,—मीं तें कायम राखलें. मी आईकडे रहावयास गेलें. आईच्या प्रेमळ सहवासांत मला कसलेंही दुःख झालें नाहीं. पण ही मायेची सावली फार काळ टिकली नाहीं. थोड्या दिवसांत या मायेच्या सावलीस मी दुरावलें व कडकडीत उन्हात मीं पदार्पण केलें. आईजवळ असलेले किडुक मिडूक विकून कसे तरी दिवस गुजराण करावयाचें मी ठरविलें. इतक्यांत माझा बाळ आजारी पडला. परिस्थितीमुळें डॉक्टरी सल्ला न मिळाल्यामुळें माझं दुबळीचें पांघरूण दूर सारून, मायेच्या पदराआडून पोपट उडाला! माझा हृदयदीप विझला, विझविला गेला!

"बाळाला मरून तीन दिवस झाले नसतील तोंच त्यांनीं आपली पापी वासना प्रकट केली. मीं विरोध करतांच त्यांनी आपला मोर्चा बाहेर वळविला. कसली ही माणुसकी? रात्रंदिवस विषयसुखांतच दंग असावं, असली त्यांची ही राक्षसी विचारसरणी माझ्या मताशीं कशी जुळणार? या मतामताच्या वादांतच त्यांना कांही कामानिमित्त कलकत्त्यास जावें लागलें. इकडची आठवण

सुद्धां नाहीं. त्यांच्या या कृतीचा मला बिलकुल राग आला नाही तेव्हांपासून मी माझ्या मनाशीं ठरवलं कीं, आपण आतां स्वतंत्र व्हायचं. आपल्या मुलीलाही शिक्षण द्यायचं व तिलाही स्वतंत्रच जगांत वागण्याचं वळण लावायचं.

" पुरुषांना स्त्री म्हणजे एक भोग्य वस्तु वाटते. तिच्यापासून मिळणाऱ्या विषयसुखाचीच ते अपेक्षा करीत असतात. तिच्यापासून होणाऱ्या अपत्याची जबाबदारी आपणावर नको असते. ही त्यांची मतलबी वृत्ति स्त्रियांना समजत नाहीं, म्हणूनच त्यांची फसगत होते. या फुलावरून त्या फुलावर उडणाऱ्या भ्रमरासारखी पुरुषांची वृत्ति पाहिली म्हणजे स्त्री हें एक त्यांचें खेळणें आहे असंच म्हणावं लागतं. अशा या घातकी पुरुषांपासून आपली फसगत करून घ्यायची नाहीं असं मीं मनाशीं ठरवलं. प्रथम मी मेडिकल कोर्स पुरा केला व नर्स झालें. थोड्याच दिवसांत ते कलकत्त्यावरून परत आले. वयस्कर पति ज्याप्रमाणें आपल्या तरुण बायकोचा छळ करतो, त्याप्रमाणें त्यांचा क्रूर स्वभाव माझ्यावर गरम होऊं लागला. माझ्याविषयीं त्यांच्या मनांत संशय आला. मी नर्स झाल्या-पासून मला बोलावणीं फार येत. त्यामुळें मीं स्वीकारलेला हा मार्ग मलाच त्रासदायक होऊं लागला. त्यांच्या मनांत तर संशयाचें जाळें पसरूं लागलें. त्यांच्या गरमपणाची आग माझ्यावर पदोपदीं पडूं लागली. या त्रासास कंटाळून मी एका तीर्थाच्या ठिकाणीं जाऊन राहूं लागलें. पण तेथेंही माझ्याविषयीं बरेच संशय घेण्यांत आले. तेथील चांगल्या लोकांवर नरकाचे कठडे बांधण्याचें पातक आपल्या माथीं नको, म्हणून मी नाइलाजानें तेथून निघून आलें. त्यांच्या विषयवासनेची मला चीड येऊन मीं त्यांना सरळ म्हटलें, ' झालें तेवढें पुरें झालें. यापुढें तुमचा माझा कोणत्याही प्रकारचा संबंध नाहीं. ' पण माझ्या बेपर्वाई उत्तरानें व वागणुकीनें चिडून जाऊन मजविषयींचा त्यांचा संशय जास्तच दृढ झाला. माझ्या या वर्त-णुकीचा त्यांनीं फायदा घेतला व थोड्याच दिवसांत दुसऱ्या एका अल्लड पोरीला घरांत आणलें ! मी त्यांची कानउघाडणी करतांच

त्यांनीं मला मारहाण करून घराबाहेर हांकलून दिलें !

"अशा या निर्दय पुरुषाचा सहवास कोणत्या मानी स्त्रीला आवडेल ? हा प्रसंग केव्हांतरी येणार हें मला कळून चुकलें होतें. यापुढें कसल्याही परिस्थितीचा विचार न करतां मी मुंबईला रहायला गेलें व एका हॉस्पिटलमध्यें नोकरी राहिलें. माझ्या या स्वतंत्र वागणुकीला बरेंच यश येऊं लागलें. अलिकडे बऱ्याच स्त्रियांची स्वतंत्र होण्याकडे प्रवृत्ति वळत आहे, पण या प्रवृत्तीचे नाशक पुरुषच होत. कुठें कां एकादी स्त्री नोकरी करूं लागली कीं, तिजविषयीं नानातऱ्हेचे संशय घ्यायचे, तिच्यावर घाणेरडे आरोप लादायचे, असा हा पुरुष जातीकडून होणारा कोंडमारा पाहिल्यावर पुरुषजातीविषयीं मनांत एक प्रकारची चीड येते ! स्त्रियांच्या बाबतींत होणाऱ्या अन्यायाचें चित्र कुणाला दिसत नाहीं असें नाहीं; पण त्याकडे जाणून बुजून डोळेझांक केली जाते. निराधार अबलांच्याकडे एकाच पापी दृष्टीनें पाहून हे संभावित नराधम साळसूदपणें जगांत वावरत असतात आणि त्यांच्या या कृष्णकृत्याकडे समाज डोळेझांक करतो. पण या नरराक्षसांच्या कपटजालांत सांपडून कित्येक स्त्रिया पतित झाल्या आहेत. कित्येकांच्या आयुष्याची राखरांगोळी झाली आहे. अशा पतित झालेल्या स्त्रियांबद्दल समाज राहोच, पण नातेवाईक मंडळीसुद्धां हेटाळणी करतात, धुडगून लावतात. मग टीचभर पोटासाठीं वाममार्गाचा अवलंब केला तर कोणती अशी वाईट गोष्ट झाली ? जर एकादी स्त्री आर्थिक बाबतींत स्वतंत्र झाली, पोटासाठीं जर ती कोठे नोकरी करूं लागली, तर तिची हेटाळणी करायची, कुचाळकी करायची. मग तिनें वाममार्गाचा स्वीकार केला तर त्यांत बिघडलं कुठें ? समाज हा मृदंगाप्रमाणें दोन्हीकडून आवाज काढतो हेंच खरें. चुकुन का एकाद्या स्त्रीच्याकडून वाकडं पाऊल पडलं, तर तें शेवटपर्यंत वाकडंच राहतें. तें सरळ करण्याची संधिच तिला हें दुष्ट जग मिळूं देत नाहीं. आणि त्याचा परिणाम त्या स्त्रीला जन्मभर भोगावा लागतो. हा काय न्याय झाला ?

# २

अत्यंत पवित्र मनानें जीवित कंठीत असतां:मरण आलें तर प्रेमानें व आनंदानें त्याचें स्वागत केलें जातें.

एकदां कार्य करण्याचं ठरविलं म्हणजे त्याच्या गळीं दैव स्वतः होऊनच विजयाची माळ घालण्यास धांवत येतें. ‘प्रयत्नाअंतीं परमेश्वर’ हें कांहीं खोटं नाहीं. याच विचाराच्या जोरावर मीं स्वावलंबी होण्याचें ठरविलें. स्वावलंबी जीवनांत मला किती यातना भोगाव्या लागल्या असतील याची कुणालाहि कल्पना येणार नाहीं. पुरुषाच्या अज्ञानाचें हें चित्र पाहून माझ्यासारख्या स्त्रीनें या जगांत दिवस कसे काढावेत, चांगल्या रीतीनें कसं रहावं व हा एक गूढ प्रश्न आहे. कांटेरी परिस्थिति उत्पन्न झाल्यावर त्यांत माझ्यासारख्या स्त्रीनें प्रवेश केला; आणि त्यांत मनाला जर्जर करणारं हें पत्र मिळाल्यावर तें पत्र तिला अधोगतीच्या मार्गाकडे नेल्याशिवाय खचित रहाणार नाहीं.

ता. .........

" प्रिय सुलभा, क्षमा कर. तुला एकेरी नांवानें हांक मारीत आहें, पण त्याला माझा नाइलाज आहे. खरं तेंच बाहेर आलं. सुलभे, एकदम विचार न करतां मी पत्र लिहिण्यास बसलों, पण मनांत असलेली गोष्ट बाहेर आली. तूं मजवर रागावशील, रागाच्या भरांत तूं मला निर्लज्ज म्हणशील; पण तो दोष माझा नाहीं, हें तुलासुद्धां कबूल केलें पाहिजे. तूं आमच्या हॉस्पिटलमध्यें येऊं लागलीस, तेव्हांपासूनच माझ्या मनांत एक प्रकारची विलक्षण भावना उत्पन्न झाली. सहा महिन्यांचा काळ पण येवढ्या अवधींत मी तुझ्याबद्दलचा विचार करूं लागलों. खूप खूप विचार केला मीं. ती विलक्षण भावना हृदयांत कशी चलबिचल करीत आहे ! ती हृदयांत मावेनाशी झाली. उचंबळून ती बाहेर येऊं लागली. तिला अडविण्याचा मीं खूप प्रयत्न केला, पण सारं निष्फळ ठरलं. मी तुझ्याबद्दल जर असाच विचार करीत राहिलों तर? माझ्या हृदयांच्या यातना तुला कळणार तरी कशा ? मी एकसारखा तुझ्या स्वभावाशीं एकरूप होऊन तुझें अंतःकरण शोधीत कित्येक रात्रीं घालविल्या आहेत. शेवटीं निराशा पदरीं येऊन नुसती कल्पना करूं लागलों. माझ्या डोक्यांत तुझ्या स्वभावाचें अंधुक चित्र दिसूं लागलें. सुलभे, तुझ्यावर प्रेम करणारे पुरुष कितीही असले तरी तूं मात्र कोणावरहि गाढ प्रेम करणार नाहींस असा माझा तर्क आहे. सर्वांच्या भावना ओळखून तू त्यांच्याशीं मोकळेपणानें वागतेस, हंसतेस, बोलतेस, खेळतेस, याचा अर्थ तुझें मन पवित्र आहे. तुझ्याकडे येणाऱ्या मित्रमैत्रिणींना क्षणांत तूं दूर आहेस तर क्षणांत तूं जवळ वाटतेस! तुझं हृदय दुसऱ्यांच्या भावनांना ' ओ ' देण्यापलीकडे असलं तरी सुद्धां माझी खात्री आहे कीं, तुझं हृदय बालकाप्रमाणें निर्विकार आहे. आणि अशा पवित्र हृदयाचा आस्वाद घेणं मूर्खपणाचं होईल काय ? आजपर्यंत मीं माझ्या मनाचा कोंडमारा केला, मीं माझ्या भावनेला दडपून टाकण्याचा प्रयत्न केला, पण आज तें दडपण–बांध–फोडून भावना उचंबळूं लागल्या, वाहूं

लागल्या, त्यांचा हा प्रवाह तुजकडे येत आहे. त्यांचा स्वीकार कर. त्याचा अव्हेर करूं नकोस ! भेटीदाखल मी सोबत आंगठी पाठवीत आहे, तिचा तूं प्रेमानें स्वीकार कर. ती आठवणीसाठी पाठवीत आहे. फूल ना फ़लाची पाकळी आहे ती. कालच मी ऐकलं तुझी हॉस्पिटलची फी चार महिन्यांची राहिली आहे. आणि अनाथाश्रमाचें बिल सहा महिन्यांचें थकलें आहे; मला कावेरीनें, माझ्या मानलेल्या बहिणीनें तुझी सारी परिस्थिति सांगितली. तूं मनांत कसलीहि शंका आणूं नकोस व याचा स्वीकार कर.

तुझा होऊं इच्छिणारा,

**डॉ. दिवाकर.**"

सविते, पत्र वाचून अशी दचकूं नकोस. अनाथ अबलांचे उद्धारक ते हे डॉक्टर ! त्यांचं प्रेम माझ्यावर बसलं होतं. माझ्याशीं त्यांचा लग्न करण्याचा विचार होता. त्यांनीं मला वेळोवेळीं आर्थिक मदतही केली. हे माझ्यावर प्रेम करणारे रामाचे अवतार दुसऱ्या एका स्त्रीवर प्रेमाची पांखर घालण्यास विसरले नाहींत. प्रेमाच्या सारीपाटाचा डाव या जगांत असाच मांडला जातो आणि उधळलाही जातो. प्रेम हें वाऱ्याच्या झुळकेबरोबर वहात आलेला पुष्पपरिमल आहे. आणि मनाचे लहरींत आलेलें काव्य कोणास आनंद देणार नाहीं ? साऱ्या दिवसाच्या दगदगींत मनुष्याला नुसत्या वाऱ्याच्या झुळकीमुळं होणारें सुख निव्वळ शारीरिक असतें.

आपत्तीच्या जीवनांत आकाश फाटल्यामुळें तो मनुष्य निर्विकार झालेला असतो. अगदीं अशीच माझी व्याकुळ स्थिति झाली होती. अशा स्थितींत मी आपली मुलगी दूर सोडून स्वतंत्र राहूं लागलें होतें. मला गतकालीन प्रसंगांची सारखी आठवण होऊं लागली. या आठवणींत, दुःखांतही सुखी करण्याची जादू असते. निरंतर सुखी असलेलीं माणसं नुसतीं दिसण्यापुरतींच सुखी असतात, परंतु त्यांचें अंतःकरण सदैव बावरलेलें असतें. उदासीनता व विचार हीं सारखीं अंतःकरणास भेडसावीत असतात.

जगांत आप्त या नात्यानें वागणारीं माणसें बरींच असतात. नात्याच्या नांवाखालीं वाटेल तो गोंधळ घालतां येतो. मामा, काका, नाना, दादा, मामी, काकू, आत्या, आक्का अशा नांवानं एकमेकांशीं नातं जोडल्याखेरीज कुणीही कुणाला दाराशीं उभं करीत नाहीं; एकमेकांला एकमेकांच्या घरांत प्रवेश मिळत नाहीं हेंही तितकंच खरं.

आज किती तरी दिवसांनीं माझा भाऊ वसंत मला भेटावयास आला होता. त्याच्याबरोबर दुसरं कुणी तरी होतं. त्या व्यक्तीचा चेहरा असा कांहीं विलक्षण होता कीं एकाद्या रुक्ष वृक्षाला पालवी फोडणारा किंवा नीरस मनाला भावनावश करणारा–सर्वांत विशेष म्हणजे शब्दसौन्दर्यानें हृदयाला हालवून सोडणारा होता. डोळ्यांत मनुष्याला गुंगविण्याची शक्ति होती. वसंतानें माझी हकिगत त्यांना सांगितली तेव्हां फार वाईट वाटलें, असें त्यांच्या चेहऱ्यावरून स्पष्ट दिसत होतें. सारेच पुरुष थोडेच निष्ठूर असतात! वसंतानें मला त्यांची ओळख करून दिली ते जातीनें बंगाली असून त्यांचं नांव रमेशचंद्र होतें. घरची स्वारी खूप श्रीमंत होती. पैशानेंच श्रीमंत नसून अंतःकरणानेंही श्रीमंत होती. लग्न कांहीं अजून झालं नव्हतं. वसंत ज्या वेळीं म्हणाला कीं यांना लग्नाशिवाय बरींच मुलं आहेत, तेव्हां मला आश्चर्य वाटलं! मीं वसंतास म्हणालें–वसंत, म्हणतोस तरी काय? पण नंतर मला खरें कळून आलं. त्यांनीं अनाथ मुलांसाठीं एक विद्यालय काढलं होतं. खाण्यापिण्यापासून तों शिक्षणापर्यंत सर्व सोय विद्यालयांत त्यांनीं केली होती. वसंतानें मला ओळख करून देत असतां रमेशचंद्र मध्येंच म्हणाले, "वसंता, नाटकाचा प्लॉट कां सांगत आहेस तूं?" असं कुठं त्यांनीं म्हटल्यावर वसंताचं बोलणं थांबलं. तरी पण त्याची बडबड चालूच होती. 'सुलभा, तुझ्या सिंधुलाही यांच्याच विद्यालयांत ठेवावी. कर्व्यांच्या आश्रमांतून तिचं नांव काढावं असं मला वाटतं.'

'बरं आहे. तसं करूं' असं म्हणून मी स्वयंपाक करावयास गेलें. मनांत म्हटलं 'अशा थोर माणसांना परमेश्वर उदंड आयुष्य देवो.'

नाहीं तर माझ्याजवळ आहे तरी काय? यापलीकडे मी काय करूं शकेन? रमेशचंद्रांचें स्वागत तरी मी कोणत्या प्रकारें करावें? गरीबींत शोभेल असंच स्वागत रमेशचंद्राचं करायचं मीं ठरवलं नि स्वयंपाक करावयास उठलें. मी स्वयंपाक करीत होतें तरी माझें लक्ष सारखें दिवाणखान्याकडे होतें. कांहीं शब्द माझ्या कानीं आले. मी कान देऊन ऐकूं लागलें. रमेशचंद्र बोलत होते—" वसंता, तुझ्या या सुलभाताईची सर्व हकिकत ऐकून व त्यांना पाहून माझं अंतःकरण कसं उचंबळून आलं. जो तूं मला सर्व जीवन–इतिहास सांगितलास व स्वभावाचें वर्णन केलेंस, तें तर कांहींच नाहीं असं मला वाटूं लागलं. वसंता, माझ्या आयुष्यांतील सुद्धां आलेल्या अशाच कांहीं प्रसंगांमुळें माझं मन इतकं हळवें झालें आहे कीं, त्या प्रसंगाचं वर्णनच करून सांगतां येणार नाहीं. दहा बारा वर्षें झालीं असतील तरी तो प्रसंग माझ्या डोळ्यापुढून जात नाहीं. अजून मला तो दिसतो आहे. वसंता, खऱ्या प्रेमाला जगांत कांहींच किंमत नाहीं. आम्ही एका चाळींत रहात होतों. आमच्या शेजारीं एक गरीब मास्तर रहात होता. त्याची मुलगी प्रभा फारच सुस्वभावी व प्रेमळ होती. त्या वेळीं ती कॉलेजात जात होती. मीहि त्या वेळीं कॉलेजांत होतों. सुट्टीनिमित्त मी घरीं आलों होतों. त्याच वेळीं प्रभाच्या लग्नाची वरात रात्रीं निघाली होती. प्रभाच्या शेजारीं बसणारे नवरदेव साठीच्या आंतबाहेर होते. त्या त्यांच्या सुरकुत्या पडलेल्या चेहऱ्यावर बांधलेल्या फुलांच्या मंडोळ्या इतक्या विद्रूप दिसत होत्या कीं, जसं कांहीं वाण्याचं प्रेतच बांधून बसवलं आहे! आणि त्याच्या शेजारीं अठरा एकोणीस वर्षांची बालिका आपल्या भावी वैधव्याचें प्रदर्शन चौघडा व बॅंडच्या नादांत होत असलेलं पाहून खालीं मान घालून सारखी रडत होती. वसंता, तें दृश्य पाहून मला इतका त्वेष आला कीं, त्या त्वेषाच्या भरांत मीं मोटारीपाशीं जाऊन बाशिंग बांधलेल्या थेरड्याला मोटारीच्या खालीं ओढलें! या माझ्या कृत्यामुळें जमलेल्या मंडळींत एकच गोंधळ उडाला. जो तो माझ्यावर तुटून पडला. हें माझ्या वडलांना कळतांच त्यांनीं मला समजूत घालून घरीं नेलें. सर्वांत आनंदाची

गोष्ट ही कीं, ती मिरवणूक तेथेंच थांबली. पण वसंता, माझ्या या कृत्यामुळें त्या मुलीवर नाहीं नाहीं ते शिंतोडे जगानें उडविले! ना सासर ना माहेर अशी तिची स्थिति झाली! तिला आई नव्हती. सावत्र आईनें छळ करून तिला घराबाहेर हाकारलें. पुढें ती लोकांच्या घरीं भांडीं घासण्यासाठीं राहिली! तें घर कुलटेचं होतं.

माझ्या स्नेही असाच चंगीभंगी होता. त्यानें मला ही सर्व हकिगत सांगितली. मला हें समजतांच मी तिकडे गेलों. मला पहा-तांच प्रभास रडूं कोसळलें. प्रभा स्फुंदून स्फुंदून रडूं लागली. मी तिची समजूत घालूं लागलों तरी तिचें रडें थांबेना. तिला अधिकाधिक हुंदके येऊं लागले. माझा स्नेही तिच्याकडे व माझ्याकडे टकमक पहात राहिला. त्याला माझी व तिची ओळख कुठली हें कळेना! रडण्याचा आवाज ऐकून ताराबाई—तिची मालकीण—बाहेर आली. ती अदमासें चाळिशीच्या आंत बाहेर होती. तिची ती बांधेसूद शरीरयष्टि, ओठाआड लपलेलें किंचित् हास्य, बोलतांना विद्युल्लतेप्रमाणें चमकणारे दांत, मदनाचें हृदय विदीर्ण करणारी तिची मोहक दृष्टि तिच्या तारुण्यांतील लावण्याची साक्ष देत होती. माझ्या मित्रानें तिची व माझी ओळख करुन दिली. मीं एकदम विचारलें, " ताराबाई, तुम्ही माझ्या प्रभाला माझ्याबरोबर धाडतां का? ती माझी मैत्रीण आहे. पाहिजे असल्यास तुम्ही तिला विचारून पहा. "

ताराबाईनें एक उसासा टाकला. तिच्या त्या गहरी नजरेनं तिनें मला आपादमस्त न्याहाळलें. मग तिची दृष्टि तिनें प्रभाकराकडे वळविली. मला वाटलें, आपल्या त्या तीक्ष्ण दृष्टीनें ती आम्हां दोघांना भाजून तर टाकणार नाहीं ना? तिनें पुन्हां माझ्याकडे पाहिलें; परत प्रभाकडे पाहिलें आणि नंतर तिच्या चेहऱ्यावर आपली दृष्टि कायम रोखून तिला तिनें विचारलें, ' प्रभा, जातेस कां तूं तुझ्या मित्राबरोबर? त्यांचें व तुझें नातें जरी मला माहीत नसलें तरी त्यांच्या चेहऱ्यावर चमकणारें सात्त्विक तेज, त्यांच्या पवित्र-पणाची साक्ष देत आहे. मला खात्री वाटते कीं, ते तुला फसविणार नाहींत. फसव्यांचा चेहरा आज मी पंचवीस वर्षें पहात आहें. त्यांच्या चेहऱ्यावरील हालचाल त्यांच्या पापी हृदयाची तेव्हांच साक्ष

देते. हे मात्र तसे नाहींत. माझी याला ना नाहीं. तूं खुशाल जा.'

प्रभानें माझ्याकडे पाहिलें. ती कांहींच बोलेना. तिनें आपल्या पदराचें टोंक हातांत धरून त्याच्याशीं चाळे सुरू केले व पायाच्या आंगठ्यानें जमीन उकरीत खालीं मान घालून स्तब्ध उभी राहिली. ताराबाईनें पुन्हां विचारलें, ' तूं जातेस ना ? ' तरी ती स्तब्धच. शेवटीं ताराबाई माझ्याकडे वळल्या व मला म्हणाल्या ' शेट आपणच विचारा तिला. माझी पूर्ण परवानगी आहे. '

मीही शेवटीं विचार करूं लागलों. पण शेवटीं विचारलेंच— " प्रभा, येतेस ना तूं माझ्याबरोबर ? ताराबाईंची तुला परवानगी आहे. माझ्यावर त्यांचा विश्वास आहे. मग येतेस ना ? "

प्रभानें खालच्याच मानेनें उत्तर दिलें, "नाहीं. रमेशचंद्र, मला येतां येणार नाहीं. आपण माझे मित्र आहांत, हितकर्ते आहांत, तरी पण आता मला या उंबरठ्याबाहेर पडण्याची इच्छा नाहीं. "

मला आश्चर्य वाटलें. प्रभा इतकी निर्लज्ज कशी झाली ! वाईट वाटलं, दुःखही झालं. संताप आला नि संतापाच्या भरांतच मी तिला विचारलें, ' प्रभा, कांहीं तुला लाज ? या घरांत समाज तुला कोणत्या दृष्टीनें पाहातो ? या पापी वातावरणांत राहून तुला कायमचें नरकाचें साधन करायचें आहे कां ? हें घर काय किंमतीचें आहे, तें तुला माहीत नाहीं का ? ताराबाईंचें काम तूं पाहिलें नाहींस कां ? याचा तूं विचार कर. अशी उद्धट होऊं नकोस. तारुण्याच्या जोरावर शिरजोर होऊं नकोस. या नरकाच्या बाहेर पड.

माझ्या या बोलण्यानें ताराबाई हंसूं लागल्या. माझा मित्र हंसूं लागला. सगळ्यांत मला वाईट वाटलं तें हें कीं, जिच्याकरतां मी अपमान सोसला तीच चेष्टेनें माझ्याकडे पहात म्हणाली, " रमेशचंद्र, इतके तुम्ही हिंडलांत, तुमच्या विद्यालयांत तुम्हीं इतक्या स्त्रियांचे चेहरे पाहिलेत, जगांत कितीतरी अनुभव घेतलेत, तरीसुद्धां सुष्ट आणि दुष्ट, सत्य आणि असत्य याची ओळख तुम्हांला चेहेऱ्यावरून होऊं नाहीं ना ? मा म्हणतात—प्रभा ताराबाईंना मा म्हणत असे—तें कांहीं खोटं नाहीं. जगाला चेहऱ्याची पारख करतांच येत नाहीं. तें नुसतं बाह्य पोशाखावरच फसतं. रमेशचंद्र,

हा नर्क नव्हे. स्वर्ग आहे स्वर्ग! या स्वर्गाच्या बाहेर मी कधींच येणार नाहीं." ताराबाईनें तिला गप्प केलें व आम्हां सगळयांना आपल्या बैठकीवर बोलावलं. आंत जाऊन आम्हीं सर्वजण बसल्यावर ताराबाईनें प्रभाला चहा करून फराळाचें आणावयास सांगितलें, त्यांची दृष्टि माझ्याकडे वळली. मी रागानें दुसरीकडे पाहूं लागलों. त्यांनीं मला हांक मारली; ' शेट, इकडे पहा, प्रभा म्हणते तें कांहीं खोटं नाहीं. तिच्या दृष्टीनें हा स्वर्गच आहे. आपल्याला वेळ आहे का ? माझी सारी हकिकत मी तुम्हांला सांगतें. म्हणजे आपली सुद्धां खात्री होईल कीं प्रभा सांगतें तें अगदीं खरं आहे.

त्या दिवशीं मला वेळही होता. तिच्या बोलण्याचं मला आश्चर्य वाटलं, मलाही तिची हकिकत ऐकून घ्याविशी वाटली. ती आपली हकिकत सांगूं लागली:—

" मी एका गरीब कुलवान् कुटुंबांतील एकुलती एक मुलगी. माझे वडील अतिशय गरीब होते. माझी सर्व जबाबदारी आईवर पडली. घरांतली अतिशय गरिबी. लोकाच्या इथं काम करून मिळेल त्याच्यावर आयुष्याची गुजराण करावी, अशा कष्टांत आम्ही दिवस काढीत होतों. मी बारा वर्षांची झाली असेन. आमच्या शेजारीं एक आमच्याचसारखें कुटुंब रहात होतें. माझ्या आईच्याच वयाची ती बाई होती. तिला एक मुलगा व एक मुलगी होती. मुलगा माझ्यापेक्षां सहा वर्षांनें वडील होता; तो त्या वेळीं इंग्रजी पांचवींत होता. फार हुशार म्हणून त्याची गणना होत होती. आम्ही एकमेकांकडे जाऊं येऊं लागलों. मधुकरानें मला घरींच शिकविण्याचें ठरवून माझें शिक्षण सुरूं झालें. माझा अभ्यास मधुकरानें बराच, इंग्रजी सहावीपर्यंत, करून घेतला. मधुकर व मी एकत्र फिरावयास जाऊं लागलों. मैत्रीचें रूपांतर प्रेमांत झालें. कल्पनेचे चंचल विलास दृष्टीस पडतांच अंतःकरणांतील विचार उचंबळून येऊं लागतात, तर भावना निसर्ग—नियमांना धरूनच असतात. आम्हां दोघांनीं लग्न करण्याचें ठरवून आपल्या आईजवळ परवानगी मागण्याचें ठरविलें. आमचें दैव चांगलें असल्यामुळें आम्हां दोघांना लग्न करण्याची परवानगी मिळाली. आमचें लग्न झालें. वर्ष भर-

तांच आम्हां दोघांवरही दुःखाचा डोंगर कोसळला. आमचीं दोघांचीं मातृसिंहासनें गमावलीं ! मातृत्वाची छाया आम्हांस दुरावली. आम्ही दोघेही पोरके झालों. दैवानें दगा दिल्यावर दुःखें एकसारखीं दुगाण्या झाडीत असतात. प्रेमळ मातेला व माझ्या आईला गुजगोष्टी सांगण्याकरतां माझे पतिहि मला या जगांत एकटीच टाकून आणि प्रेमाचं मोल माझ्या उदरीं ठेवून चालते झाले ! त्या पवित्र प्रेमाच्या मोलामुळें या जगांत मी व्यभिचारी ठरलें. गांवांतील लोक माझी टवाळी करूं लागले.

पतीच्या प्रेमाचा तो पहिलाच पवित्र प्रसाद पाप ठरवून मला समाजशिष्टांनी नामशेष करण्याचा प्रयत्न चालविला. नाहीं नाहीं तो त्रास मला सहन करावा लागला, भोगावा लागला. त्याचा शेवट या नीचांनीं पोलिसांपर्यंत नेऊन माझी विटंबना केली. कायद्याप्रमाणें माझ्यावर खटला भरण्यांत आला. डॉक्टरी तपासणी झाली. मी पवित्र असतांना पापी ठरलें. या पापी जगांत मी व्यभिचारी ठरलें. नाहीं नाहीं त्या तऱ्हेनें माझा छळ केला. आणूं नये तीं संकटें मजवर त्यांनीं आणलीं. दुःखांत सुख म्हणजे मी सुखरूपपणें बाळंत झालें, व मला मुलगा झाला. माता झाल्याचा आनंद झाला. माता झालेल्यांनाच तो कळेल ! असल्या बिकट परिस्थितीतही मला आनंद झाला. मला पतिदर्शनच पुन्हां झालें असें मला वाटूं लागलें ! त्या आनंदभरानें माझ्या अंगावर रोमांच उभे राहिले. हा माझा आनंद थोड्या भराचा होता. क्षणभंगुर सुख तें, पण साऱ्या दुःखांना तें बाजूस सारीत होतें. पुढें येणारें दुःख हें जर मानवी प्राण्याला कळतें तर दुःखाचा मागमूसही या जगांत दिसला नसता. माझ्या बाळाला जन्मून अवघे चार तास झाले असतील तोंच तो माझ्या सौख्याचा हिरा हरपला ! दुर्दैवानें माझं रत्न माझ्यापासून हिरावून नेलं. मीं पुष्कळ शोक केला, पण देवाला माझी दया आली नाहीं. उलट दुर्दैव माझ्या अब्रूचे धिंडवडे जगापुढें मांडण्यासाठीं माझ्या पाठीशीं हात धुवून उभें होतें. मीं मूल मारलें हा आरोप मजवर लादला गेला. मीं माझी बाजू खूप मांडली, पण पोलिस अधिकाऱ्यांनीं ती जुमानली नाहीं. मला

सारखीं पोलिसांचीं बोलावणीं येत. त्यांचा हा कावा माझ्या लक्षात आला. म्हणून मी त्यांना भेटण्याचें टाळीत असे. पण मला काय-द्याच्या गचांडींत त्यानीं धरलें, व त्यामुळें माझं मौल्यवान शील चुरगळलं गेलं. ब्रह्मांडाला ऐकूं जाईल इतक्या मोठ्यानें मी समा-जाला शिव्या देऊं लागलें! पण त्याचा उपयोग झाला नाहीं. तासन् तास मी रडत बसे. मीं परमेश्वराचा खूप धांवा केला. पण त्या निर्दय परमेश्वराला माझी कींव आली नाहीं. माझ्यासारख्या अबलेची हांक त्याला कशी ऐकूं जाणार!

सतीचा हंबरडा त्याच्या कानीं गेला नाहीं, तर पतितांची दाद तो कशाला घेईल? श्रीमंत भक्तांची बडदास्त राखतां राखतां ईश्व-राची तारांबळ होत असेल, नाकीं नव येत असतील बिचाऱ्याच्या; दुसरें काय? सारांश, देव अनाथांचा नाहीं; आणि सत्याचा कोणीच पाठीराखा नाहीं, हेंच खरें.

माझें पहिलेंच व शेवटचें वांकडें पाऊल माझ्या मनाविरुद्ध पडलें. जगांत मी अगदीं एकटी पडलें. माझं पातिव्रत्य कवडीमोल ठरल्या-मुळें माझ्या जीवनांत चैतन्य मुळींच राहिलं नाहीं. मी तें गांव सोडलें व या शहरीं मोडतोड करून कसे बसे दिवस काढले. पुढें पतीनें दिलेलें शिक्षण उपयोगीं पडलें. दोनतीन घरंदाज घराण्यांमध्यें मला शिकवण्या मिळाल्या. पोटाची गुजराण होऊं लागली. पण धूर तिथें विस्तव असणारच, या न्यायानें तेथेंही लोक त्रास देऊं लागले. पहिल्यापासून माझी रहाणी टापटिपीची, त्यांत नैसर्गिक सौंदर्याची भर, मग काय? संभावितांची सोदेगिरी सुरू झाली. टवाळांना फावलें. आणि त्यांत मी एकटी. मग काय विचारतां? जगांत निर्लज्ज लोकांचाच भरणा जास्त. पण अशा वेळीं माझी देवाला कींव आली. माझी एक मैत्रिण त्याच गांवीं मास्तरीण होती. ती, तिच्या चार मुली व आम्ही एकाच ठिकाणीं राहूं लागलों. पण माझ्या दुर्दैवानं नमूताईंना टॉयफाईड होऊन त्या लवकरच निवर्तल्या. तिच्या चार मुलींना दुसरं कुणीच नव्हतं. सर्व जबाबदारी माझ्यावरच येऊन ठेपली. याचा फायदा टवाळांनीं भलताच घेऊन, माझा हा कुंटण-खाना आहे अशी उगीचच ओरड करून, रस्त्यानें जातांना चिठ्ठ्या

चपाट्या व पैसे टाकूं लागले ! मीं मनाशीं ठरवलं, या लोकांची चांगलीच खोड मोडावी. मी ते पैसे खुशाल घेई. देहानं व मनानं शुद्ध राहून, लोकांनीं आम्हांला साज चढवायचं मनांत आणलं तर आलेल्या लक्ष्मीला आम्हीं तरी पारखें कां व्हावें ? याच वेळीं ही प्रभा माझ्या घरीं आली. पुढें पुढें हा त्रास कमी होऊं लागला. ज्या घरीं मला शिकवण्या मिळाल्या होत्या, त्यांच्या कानावरही पुष्कळ वाईट गोष्टी गेल्या. पण ते सुधारक व सुशिक्षित असल्यामुळें त्यांनीं जगाच्या भुंकण्याकडे लक्ष दिलें नाहीं. मीहि त्यांना माझी खरी गोष्ट सांगत असें. त्यामुळें त्यांचा मला फार आधार होता.

रमेशचंद्र ताराबाईंची हकीगत सांगत असतां त्यांच्या व वसंताच्या डोळ्यांत अश्रु आलेले पाहून मीं मनांत म्हटलें, स्त्रियांची दुर्दशा पाहून तळमळणारी पुरुषजात आहे म्हणायची एकंदरींत !

संध्याकाळची वेळ. सूर्य दमून आपल्या शयनगृहीं पदार्पण करण्याच्या अगदीं विचारांत होता. आपलीं सोनेरी पिवळीं किरणें आकाशांत चोहींकडे पसरलीं होतीं. आनंद मनाला झुलवीत होता. माझ्या हृदयांत एक सुंदरतेचा पुष्प–गुच्छ तयार होत होता, हें कुणालाही कळलं नाहीं. आनंदाच्या अफाट मैदानांत अविश्रांत धावणारं माझें मन क्षणभर स्तब्ध होऊन कोणाची तरी मूर्ति न्याहाळीत आहेसें मला वाटलं. काव्यानं मन अगदीं बहरलं होतं.

**सुंदर कलिका सुमन रसाचे घेई घुटके प्रेमरसें**
**चैतन्याच्या गोड प्रभावें रोमांचिलें प्रेमभरें**
**प्रीतिसारखा रोग जयाला आग लागुनी मन भडेक**
**रमलें माझें मन गुंगलें चुंबुनि काव्यसुधाविणें**
**अधिररसाचे पाश मदनाचे चित्त बावरें चोहिंकडे**

हृदयसागरांत बहरलेला हार माझ्या तीव्र निराशेची साक्ष देत होता. हृदयांत प्रेमाची ज्योत पेट घेते न घेते तोंच निराशेनें मन तळमळूं लागतं. स्वर्गीय सुखाच्या अंधुक कल्पनातरंगानें मन भांबावूं लागतं नि तें जगाजवळ सुखाची याचना करूं लागतें.

---

# ३

रमेशचंद्रांनीं पुढें प्रभावतीशीं पुनर्विवाह कां केला नाहीं हें तरी कोडेंच आहे. जग बाह्य रंगाला फसतें. त्याच्या अंतरंगाची कुणी ओळखच करून घेत नाहीं. वरून संभावित दिसणारे रमेशचंद्र सत्यप्रिय असतील का? मीं त्यांना विचारावयाचं ठरवलं. जेवायला बसल्यावर विषय काढावा असं ठरवून मी पाट-पाणी करायला आंत निघून गेलें. वसंतानें व रमेशचंद्रांनीं जेवावयास सुरुवात केली. मीं हळूच प्रश्न काढला. रमेशचंद्र मजकडे पाहून म्हणाले, 'पुढें कांहींच नाहीं. मी ताराबाईचा निरोप घेतला तोंच प्रभा मजकडे पाहून बाईंना म्हणाली, 'मी जाऊं ना यांच्याबरोबर?' तिला मीं एकदम उत्तर दिलें. 'नको प्रभा. तूं इथेंच रहा. जन्मदात्री जरी तुला सोडून गेली असली, तरी तुझ्या सर्व आयुष्याची जबाबदारी वाहणारी इतकी प्रेमळ माता तुला मिळाल्यावर तूं हा हक्काचा स्वर्ग सोडूं नकोस.'

वसंत मध्येंच म्हणाला 'रमेश, तूं तिजबरोबर पुनर्विवाह कां नाहीं केलास!' रमेशचंद्रांनीं वसंताकडे पाहून माझ्याकडे

पाहिलें. माझ्यापासून कांहीं तरी शोधण्याचा प्रयत्न तें करीत असावेत असें वाटलें. कांहीं तरी बोलायला पाहिजे म्हणून मीं म्हटलें, त्या मुलीला तुमच्याजवळ नाहीं वाटतं ठेवलीत ? " तें असं झालं वसंतराव, प्रभावतीनें मला त्याबद्दल कांहीच विचारलें नाहीं. माझ्या मनांत होतं, पण तें मनांतच राहलं. पुढें तिला लागेल तो खर्चहि मी करीत होतों. मीं तिच्या नोकरीकरितां पुष्कळ खटपट केली. पण यश आलें नाहीं. पुढें कांहीं दिवसांनीं तिला क्षयानें पछाडलें. पुष्कळ औषधपाणी केलें, पण कांहीं यश आलें नाहीं. कल्याणला ठेवली. तिथेंच ती आटोपली." वसंतरावांनीं विचारिलें, ' पण काय हो, आपण लग्न कां नाहीं केलें ? ' हें विचारल्यावर त्यांनीं जो उसासा टाकला तो एवढा मोठा कीं भात वाढीत असलेली मी दचकून दोन पावलें मागें सरलें. स्त्रियांच्याच आयुष्याचीं अशीं स्थित्यंतरें होतात असें नाहीं, तर पुरुषांच्याहि आयुष्याची घडामोड होतेच. त्यांचीं जेवणें आटोपलीं. ते बाहेर गेले. मीं पान वाढून जेवायला बसलें. पण माझ्या मनांत नानातऱ्हेचे विचार सुरू झाले. त्यांतल्यात्यांत रमेशचंद्राना पाहिल्यासून माझ्या मनाची स्थिति बावरली होती. मी न जेवतांच स्वयंपाकघरांतली सगळी आवराआवर करून, मी माझ्या खोलींत जाऊन स्वस्थ पडलें. अंतःकरणाच्या तळमळीचें कारण लक्ष्यांत येतांच मी माझ्या भावना जागच्याजागींच मारीत असें. उपासमारानें देहाला झिजवीत असें.

माझ्या उदास मनोवृत्तीचें वर्णन मला करतांच येत नाहीं. अनेक भावनांनीं माझें मन भांबावून जातें. अन्तःकरणांत होणारी तळमळ ज्यांनीं अनुभवली असेल, त्यांनाच याची कल्पना करितां येईल. सुखस्वप्नांनीं देहभान उडून गेलें, तरी त्या तल्लीन अवस्थेंत पहांटेची मधुर वेळ आपल्या सौम्यतेचा अन्धार पाडून, अरुणाच्या प्रकाशानें अन्धाराचें विस्मरण करते. माझ्या मनांत सारखें येतें, आपण वाटेल त्या रितीनें हाल भोगले; आतांपर्यंत इच्छा मारल्या, तरी त्याचा उपयोग कांहींच नाहीं. जगाची दृष्टि कोती बनल्यामुळें, त्यास

निर्दोषतेंतही दोष दिसतात. समाजाच्या मनाला जडलेली ही व्याधि आहे. संसारिक रम्यपणाची आमच्या अन्तःकरणाला भुरळ पाडते. म्हणून त्यांतील रहस्य जाणणेंहि कठीण. रमेशचंद्राच्या दृष्टिमोहांतून सुटून माझ्या मनानें नवीन विचारानें नवीन देह व नवीन अनुभव घेण्याच्या तयारीनें तो मार्ग चालून पहाण्याचें ठरविलें. त्याच वेळीं मुंबईला एक नवीन कंपनी निघण्याचें घाटत होतें. सुशिक्षित लोकांनीं ती लिमिटेड करण्याचें ठरविलें असून, त्यांत स्त्रियांचीं कामें स्त्रियांनींच करावींत असें ठरविलें होतें. तिथें मी चौकशी करून, माझा शिरकाव करून घेतला. नाट्यसृष्टीशीं समरस होतांच मला माझ्या दुःखाचा विसर पडला. आजपर्यंत निराशेनें निसहाय झालेल्या माझ्या जीवाला दास्याचा दडींतून आज जगाच्या बाजारांत येतां आलें. माझ्या मनाला नवीन विचाराचें मौल्यवान पेय मिळालें. पण तें पेय मला रुचकर लागण्याऐवजीं कडवट लागूं लागलें. त्यांतील तें वातावरण मॅनेजरपासून मालकापर्यंत एकजात. एक धोरण आणि विचित्र स्वभाव. माझ्याबरोबर आणखीहि स्त्रिया होत्या. पण त्यांची तीं वर्तणूक, पुरुषांच्या पुढें पुढें करण्याची संवय व नटवर्गाशीं होत असलेली सलगी, त्यांतच झालेले ते प्रीतिविवाह. छे ! हें सगळें वर्णन करायचं म्हणजे नाट्यसृष्टीचें नमुनेदार प्रदर्शनच भरविलें पाहिजे. पुढें मी सिनेटोनचा अनुभव घेण्याचें ठरविलें; व त्याबाबत खटपट करूं लागलें. पण त्यांत यश जेमतेमच.

प्रि. अत्रे यांनीं भ्रमाच्या भोपळ्यांत वर्णन घातलें आहे. ' तुमचा आवाज फुटला म्हणजे मग तुम्ही सिनेमांत या. ' किती यथार्थ वर्णन आहे हें ! सिनेमा डायरेक्टर्स म्हणजे इंद्राच्या गादीवर बसलेले. त्यांच्या नजरेंत भरेल ती नटी ते पसंत करतील. मग ती कॅरेक्टरला सूट असो किंवा नसो. ती नाक नसलेली अप्सरा असो किंवा बटबटीत डोळ्याची डाकीण असो. ती चांगली आहे कां नाहीं हें प्रेक्षकांनीं ठरवावें. मग डायरेक्टर्स कशाकडे पहातात कोण जाणे. अर्ध्या हळकुंडानें पिवळे होणारे नट व सिनीयर नटी, सग-

क्याचा मिलाफ एकच ! कथानक पहाणारे प्रेक्षक. मला तर त्या विचारांचें हसूं येतें. कारण त्यांत गाजरपारखी लोकांचाच भरणा अधिक असतो, असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें. पण कांहीं सिनेटोन्सनीं नटांची पारख किती यथार्थ केली ! कलकत्याची न्यू थिएटर्सची उमाशशी, माया वगैरे; मुंबईच्या इंपिरियलमध्यें काम करीत असलेली सुलोचना किंवा माधुरीच्या कामानें प्रसिद्धीस आलेली रणजित, साऱ्या मुंबईला वेड लावणारी बॉम्बे टॉकीजची देविकाराणी, या कंपनीच्या डायरेक्टर्सनीं नटनटींची निवड किती योग्य केलेली असते बरें. हेंच अनुकरण जर इतर डायरेक्टर्स करतील, तर किती बरें होईल. पण हा महत्वाचा प्रश्न प्रत्येकाचा स्वतंत्र आहे. ज्याच्या अडचणी त्यालाच कळायच्या. इतरांना त्यांचें महत्व समजणार नाहीं. सवितें, एकदा नीतीचीं बंधनें ढिलीं पडल्यावर अनाथ जीवांची जगाकडून पाणपोयीच समजली जाते. त्यांतले त्यांत माणसांनीं धीर धरून, परिस्थितीशीं झगडण्याचें धैर्य आणलें पाहिजे. सुखोपभोगांची रूपरेषा प्रत्येकानीं आंखली पाहिजे. तुला अधिक काय सांगूं ? पण मला मात्र अजूनहि मानवी जिवनाचें कर्तव्य समजलें नाहीं. मानसिक दुःखानें माझें मन व्याकुळ होतें. तें कां हें मला उमगलें नाहीं. पण मी जिवाला कंटाळलें हें मात्र खरें. माझें कर्तव्य माझ्याकडून होईल कां नाहीं हीच शंका पदो-पदीं मनांत येते. मी माझ्या मनाला नेहमीं उपदेश करितें, 'मना, तुला कर्तव्य करायचें आहे. जगासाठीं जरी नाहीं, तरी तुला तुझ्या सिंधूसाठीं तरी जगलें पाहिजे. तिचें सर्वस्व तुझ्यावर अवलंबून आहे. तिच्या जन्मामुळें तुला यथार्थ ज्ञान होऊं लागलें.

वात्सल्यप्रेमाकरतां आजपर्यंत मी माझ्या मनाला विकारवश होऊं दिलें नाहीं. अनेक सुखें पायाशीं लोळण घेत असतां मी त्यांची पर्वा केली नाहीं. पण रमेशचंद्राचा परिचय थोडा असून, माझ्या मनांत त्यांच्याविषयीं आपलेपणाची भावना उत्पन्न झाली. याचें कारण रमेशचंद्र बुद्धिमान असून, सुशिक्षित होते. त्यांचा चेहरा

गंभीर व बाणेदार असून ते लोकांवर उपकारकर्ते होते. त्यांना पाहिल्यापासून माझं मन फार व्यथित झालं हें खरं. पण खरं सांगू, माझ्या मनांत अन्तःचक्षूनें शोधलं तर काय सांपडेल ? मन हें सुखाची अपेक्षा करतें. पण नाइलाजानें मनाला खेचावें लागतें. बाह्यमनाचें दडपण असल्यामुळें, भित्रेपणानें पाऊल मागें खेचलें जातें. माझ्या डोक्यांत अनेक वेळां अनेक विचारांचें थैमान सुरूं होतें. आणि तीन वर्षांपूर्वी घडलेल्या हकीगतीचें चित्र डोळ्या-समोर दिसूं लागतें. अगदीं अनपेक्षित रितीनें एक दिवस मीनाक्षी आपल्याकडे आलेली पाहून, आपल्याला किंचित आश्चर्य वाटलें. त्या वेळेस तिचें तें हिरमुसलेलें तोंड पाहून आपल्या मनांत कोणती शंका आली ? त्या वेळेस तूं म्हणालीस कीं, ' प्रेमानें मनुष्य वेडा झाला कीं भोंवतालचें जग त्याला तुच्छ वाटतें. ' त्यावर मीं तुला सहजच म्हटलं, 'म्हणूनच लोक त्यांची निंदा करतात वाटतं. बाकी त्यांची ती निंदा अशा प्रेमवेड्यांना थोडीच कळणार ! तें वेड घालवण्याकरितांच कीं काय, लोक उपहास करतात व त्यांच्या नाते-वाईक व प्रिय माणसांची निंदा करतात. अशा रितीनें समाजाकडून त्याला अधिक त्रास होतो. तेव्हां तो सर्व गोष्टींचा त्याग करतो, त्याचें मन नीरस बनतें. लोकांच्या उपसर्गाला कंटाळलेल्या जीवा-लाच हें गूढतत्व समजेल. गरीब बिचारी मीनाक्षी माझ्याकडे आल्यावर स्फुंदून स्फुंदून रडूं लागली. रमेशचंद्राचे भोंवतीं घिरट्या घालीत असलेलें माझें मन मीनाक्षीकडे वळलें. कलाप्रेमी माणसा-बद्दल मला फार आवड. पण मनाच्या हेलकाव्यामुळें ती पुढें जात नसे. मीनाक्षी ही नायकीण होती. एका नामांकित सिनेमानटाशीं तिचें लग्न झालें होतें. तिनें आपल्या संसारसुखाचं चित्र आपल्या-पाशीं कसं रेखाटलं होतं आठवत कां तुला ? त्या वेळीं मीनाक्षी म्हणाली, 'तुम्ही दोघी धन्य आहांत. या जगामध्यें विचारानें पाऊल टाकलेंत, म्हणूनच माझ्यासारखा प्रसंग आज तुमच्यावर आला नाहीं.' मी तिला मध्येंच अडवून विचारलं. 'पण काय ग मीनाक्षी, असे पागलप्रेमी तुमच्यासारख्यांच्या घरीं नेहमींच येत असतात.आणि

त्यांचे व्यवहार व स्वभाव तुझ्या परिचयाचे नसावे! नवलच वाटतें मला. मीनाक्षी म्हणाली सुलभा त्यांचे स्वभावगुण जर आम्हांला समजले असते, तर आम्हां नायाकिर्णांचे संसार सुखाचे झाले असते. आणि पृथ्वीवर पापांचें ओझेंही झालें नसतें. अग, आमच्याइतकीं दुःखं तुला कोणाच्याच घरांत पहायला मिळणार नाहींत. जगांत स्वार्थी व क्षुद्र विचारांच्या माणसांचाच भरणा अधिक आहे.

आमच्या घरीं नेहमीं अशींच माणसं येत असतात. मीं नेहमीं ऐकत आलें, लग्न म्हणजे पावित्र्य. ही नुसती मनाची समजूत. लग्न म्हणजेच पागल. आणि म्हणूनच मीं माझ्या आयुष्याला ह्या पवित्र लग्नाचीं जोड दिली. त्या पवित्र लग्नाचा साद मला कसा अनुभवास आला तें सांगतें, ऐक. दुसऱ्याच्या दुःखानें दुःखित होणाऱ्या तुम्ही व दुःखग्रस्त मी, म्हणून मी तुमच्याकडे धांव घेतली. आपण दोघी समदुःखी आहोंत. दुसऱ्याच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले कीं, तुमच्या हृदयाला पाझर फुटतो. दुःखामुळें मनुष्याच्या अंगीं असलेल्या उत्तम गुणांची कसोटी लागते व त्यामुळें तो जगामध्यें पुढें येतो. माझें मन किती विव्हल आहे तें मीं कसं सांगूं? संसाराच्या निराशेनें मन कसं भांबावून गेलं आहे. माझ्या घराण्यांतील स्त्रियांचें चरित्र ऐकलं म्हणजे त्या निंद्य जीवनाची मला शिसारी येते. आणि म्हणून मीं लग्न करायचं ठरवलं. त्यानंतर अरविंदाची व माझी ओळख झाली. या नाटक कंपनींना काय बघायचं? त्यांची माझी ओळख झाल्यावर त्यांनींच मला लग्नाविषयीं विचारलें. मींही तें आनंदानें कबूल केलें. पुढें आमचें लग्न झाल्यानंतर आमचा सुखाचा संसार किती दिवस झाला असेल? आमची बेबी होईपर्यंत. थोड्याच दिवसांत त्यांचा स्वभाव माझ्या परिचयाचा झाला. पण उपयोग काय? गप्प बसणं प्राप्त होतें. घरांत होत असलेल्या वर्तनाकडे दुर्लक्ष केलें. पण माझ्या गप्प बसण्यांनीं त्यांनीं वाटेल ते चाळे करायला सुरवात केली. माझी आई व आजी गोव्याकडे निघून गेल्यावर घरांतील मालमत्तेवर त्यांनीं चांगलाच हात मारला.

पैशाच्या जोरावर माणसाच्या आयुष्याला कीड लागते. माझ्या आकांक्षा जळून खाक झाल्या. संसारयात्रा मध्येंच थबकली. मी माझ्या मनांत नानातऱ्हेचे विचार करीत होतें. त्यांच्या दुर्वर्तनापासून त्यांना कसें परावृत्त करावे, पतिसेवा कशी करावी, पतिपूजेकरितां अंतःकरणरूप उपकरणीं स्वच्छ धुवून, कपट काढून टाकून, स्वार्थ काढून लावला पाहिजे. मनाची भीडमर्यादा दूर लोटली पाहिजे. पतिप्रेमाची जोड कायम राखण्याकरितां स्त्रियांनीं वाटेल ते हाल सोसले पाहिजेत. आपण आजपर्यंत ऐकत आलों. पुराणकालीन व ऐतिहासिक स्त्रियांनीं काय थोडें तप व तपश्चर्या केली? तसें मीं काय केलें? आणि करायचं मनांत आणलं तर शुद्धीवर तरी कुठं असतात? मीं समजून चुकलें, माझें जीवन व्यर्थ आहे. पण एवढ्यावरच कुठं थांबलं? सुलभे, माझ्या दुःखाचा शेवट ऐकण्याकरितां मनाला घट्ट कर. बेबी झाल्यापासून दिवसभर मोलकरणीसारखं काम करावं. रात्री विश्रांतीला पडावं तर तेंही सुख माझ्या नशिबी नव्हतं. रात्रभर पाय चेपत बसावें. झोप येऊं लागली कीं, मार खावा.

माझ्या या दुःखी आयुष्याला मीं कंटाळलें. पण काय करूं? कुठं जाऊं? आमचे जातभाई मला हसूं लागले व कांहीजणी आमच्या धंद्याच्या दृष्टीनें मला उपदेश करूं लागल्या. एक दिवस बेबीला ताप आला. त्यांतच तिला गोंवर निघाला. तिच्या जिवाची साऱ्या दिवसभर होत असलेली कहाली पाहून माझें मन एकसारखें तळमळूं लागलें. दिवस कसातरी गेला. पण रात्र कशी जाणार, या चिंतेंत मीं होतें. म्हणून त्या दिवशीं मला पतिसेवा करण्यांस जातां आलें नाहीं. बेबी सारखी तळमळत होती. ती डोळे फिरवूं लागली. मला धीर धरवेना. डाक्टरांचें साहाय्य पाहिजे असं मला वाटूं लागलं. म्हणून मी त्यांच्या खोलीत गेलें. तों पुढील विचित्र दृश्य माझ्या दृष्टीस पडलें. म्हणून मीं तशीच मागें सरलें. क्षणभर विचार केला, आणि आमच्या खालीं एक सालस बिऱ्हाड रहात होतें त्यांच्याकडे जाऊन त्यांना डॉक्टरला बोलावण्याची विनंती केली. मीं वर

आलें तो एकदम माझ्यावर गहजब झाला. बेबीचा प्राण कासावीस होत होता. मीं रडत रडत त्यांना म्हटलें, बेबीचे डोळे पांढरे होऊं लागले आहेत. जरा इकडे बघा. बेबी टकमक त्यांच्याकडे व माझ्याकडे आळीपाळीनें पहात होती. तिच्या त्या केविलवाण्या पहाण्यानें त्या निर्दय कसाबाचें अंतःकरण द्रवलें नाहीं. मी जास्तच रडूं लागलें. बेबी माझ्या तोंडाकडे पाहून रडूं लागली. आई, हीं शेवटची हांक मारून तिनें कायमचे डोळे मिटले! माझ्यावर ब्रह्मांड कोसळलं! माझ्या आशेचा किरण, माझी बेबी! ती मला सोडून चालती झाली. मी मोठ्यांदा रडूं लागलें. म्हणून स्वारीनें रागावून जाऊन माझ्या कमरेंत लाथ हाणली. बेबीच्या प्रेतासह मला त्यांनीं खोलीबाहेर काढली आणि दार लावून घेतलें. मी दोन्ही हातांनीं बेबीला घेऊन दारांत उभी होतें. तोंच खालचे शेजारीं डॉक्टरना घेऊन आले. त्यांनीं बेबीला पाहिलं. तो कांहीं नाहीं. त्या शेजाऱ्यांनीं पुढील सर्व व्यवस्था केली. मी त्यांच्या घरीं चार दिवस होतें. तरी पण दुःखाचा विसर पडेना! पुढें तर मला वेड लागलें. त्यांतच मेलें असतें तर बरें झालें असतें. पण पापी माणसाला यमाच्या दरबारीं कुठें जागा मिळणार? मीं बरीं झालें व नाटककंपनींत पोटावारी राहिलें. इथेंही मला तोच त्रास होतो आहे. पण काय करूं? तुम्ही मला तुमची बहीण म्हणून संभाळाल का? मीं लगेंच हो म्हटलें. मीं तिला विचारलें, तुम्हांला पेटी वाजवितां येते कां? मी तुम्हांला क्लास काढून देतें. तो चालवाल कां? तिला माझें म्हणणें पटलें. ती कबूल झाली व मीं तिला घरीं घेऊन आलें. माझें मन अलिकडे फार वेडें बनलें होतें. दैवाचे खेळ विचित्र खरेच. मीनाक्षीप्रमाणें मी पण वेडी आहे. माझें वेड जाण्यांस जगाकडूनच मला मदत होत असे. ज्या वेळेस माझ्या मनाला रमेशचंद्रांनीं वेडें केलें, त्याच वेळीं माझी आणि मीनाक्षीची ओळख झाली. माझ्या शेजारीं एक विधवा बाई रहात होती. ती लोकांच्या घरीं स्वयंपाकाला जात होती. तिला एक १० वर्षांची मुलगी व १८–१९ वर्षांचा मुलगा होता. मुलीचें लग्न झालें होतें. मुलगा आपला उडाणटप्पूच होता. त्या मुलाला पाहिल्यापासून

माझ्या मनांत एक शंका येऊं लागली होती व ती माझी शंका खरी ठरली. त्या बाईंना कुठून तरी दरमहा १० रु. येत असत. माझ्याकडे त्या नेहमीं येऊन बसत. पण मला चकाट्या पिटण्यास वेळच नसे. कारण आम्हीं हार्मोनियम क्लास काढला होता. बरींच मुलें व मुली आमच्या क्लासमध्यें येत असत. मीं बाहेर शिकवण्या करीत होतें. एकदां मीनाक्षी अजारी असल्यावरून क्लास बंद होता. नेहमींप्रमाणें अंबूताई, त्या विधवाबाईचें नांव, माझ्याकडे बसण्यास आल्या होत्या. बराच वेळ आम्ही नित्याप्रमाणें इकडल्या तिकडल्या गप्पा मारीत होतों. बोलतां बोलतां मी म्हणालें, 'अंबूताई, तुम्ही शिकाना पेटी. तुमच्या मुलाला शिकवा. आम्ही कांहीं तुम्हांला फी मागणार नाहीं. आणि मुलीचें लग्न इतक्या लवकर कशाला केलेंत ?'

अंबुताई एकदम निराश होऊन म्हणाली-अहो, काय सांगूं तुम्हांला माझं कपाळ ! उसासा टाकून त्या पुढें म्हणाल्या, 'जाऊं द्या झालं. तुम्ही हुषार, शहाण्या, म्हणून कांहींतरी स्वकष्टानें उदरनिर्वाह करीत आहांत. पण आम्ही अडाणी बायका पोटपाटलाटण्याशिवाय काय करणार? घरीं सगळं चांगलं होतं, पण नशिबच दरिद्री त्याला कोण काय करणार ?' मीं म्हटलें, 'म्हणजे ? अंबूताई, तुमच्या बोलण्याचा अर्थ मीं नाहीं समजलें.' अंबूताईंनीं विकट हास्य केलें व त्या म्हणाल्या, 'माझ्या बोलण्याचा अर्थ ? अहो, सगळाच जिथें अनर्थ, तिथें कसला घेऊन बसलांत अर्थ ?' 'अंबूताई, खरच सांगूं, मला तुमची हकीगत ऐकण्याची फार इच्छा आहे. सांगाल कां ?'

'सुलभाताई, आजपर्यंत मला कुणीं विचारलं नाहीं; आणि जरी कुणीं विचारलं असतं तरी मी काय सांगणार ? अमर्याद आयुष्यांत घडलेले परिणाम कुणाला सांगूं ! आणि त्याचा उपयोग काय ! माझं काडीमोल ठरलेलं जीवित, माझा सौभाग्यरवि चमकत असतां मी पांढऱ्या फटफटीत कपाळानें या गांवांत हीं दोन पापाचीं फळें घेऊन दिवस कंठीत आहें. खरं वाटेल कां तुम्हांला !'

'हो, वाटेल. मीं लगेच म्हटलें. अंबुताई, मीहि तुमच्याप्रमाणें कुल-

कंताच्या घरांत जन्म घेऊन घराण्याला कलंकित करणारी तुमची समदुःखी बहीण आहे असंच समजा. मला प्रत्येक स्त्रीच्या आयुष्याचा अनुभव प्रसिद्ध करायचा आहे. आणि म्हणूनच तुमच्या आयुष्याचा मला परिचय करून द्याल तर फार बरं होईल. असं म्हणून मी त्यांना माझी हकीगत व आणखी दोन उदाहरणं सांगितली. त्यावर त्या म्हणाल्या, 'तुम्ही जें सगळं सांगितलंत त्याच्या अगदीं उलट माझं आहे.' मीं आश्चर्यानें म्हटलं, 'म्हणजे ? सांगा तर खरी तुमची हकीगत. अंबूताईंनी आपल्या मुलीस बाहेर जाण्यास सांगितलें व त्या म्हणाल्या, मी लहान असतानांच माझी आई वारली. पुढें लवकरच माझं लग्न झालं. त्या वेळेस मी तेरा वर्षांची असेन. आमच्या वाड्यांत एक जोशांचें बिऱ्हाड रहात असे. लहानपणापासून मला सोनूताईचा लळा फार. सोनूताई आपल्या माहेरा जाण्यास निघाल्या. त्यांच्या भावाच्या मुलाची मुंज होती. मीही त्यांच्या पाठीस लागून त्यांच्याबरोबर निघालें.

लहानपणीं गाडींत बसण्याचा मला फार नाद; आणि लहान मुलांना लग्न, मुंजी म्हणजे चंगळ. कमळपुरास मी कधींच आलें नव्हतें. त्यामुळें मला गंमत वाटे. त्याच वेळीं तिथें कुस्त्यांचा प्रोग्राम होता. आम्ही सर्व लहानमुलें कुस्त्या पहाण्यास गेलों. कुस्त्या संपून आम्ही घरीं परत निघालों. त्या वेळीं बराच अन्धार पडला होता. सोनूताईचे वडील भाऊ आमच्या बरोबर होते. त्यांनी सर्व मुलांला पुढें जाण्यास सांगितलें व माझ्या हाताला धरून, गर्दीतून आम्ही बाहेर पडलों. त्यांनीं माझी चौकशी करण्यास सुरवात केली. त्यांतच ते माझ्या पतीचें वर्णन विचारूं लागले. पण मला त्या वेळेस काय कळणार ? मी कांहींच उत्तर दिलें नाहीं. त्यानंतर ते म्हणाले, तुझी आई केव्हां वारली ? आईची आठवण होतांच मी रडूं लागलें. वडिलांच्या त्रासानें व गरीबीला कंटाळून मागील दारच्या आडांत तिनें जीव दिला. मला रडें आवरेना. मी एका झाडाच्या आश्रयानें उभी राहिलें. भाऊंनीं पुढें होऊन माझ्या

पाठीवरून हात फिरवला, व माझी समजूत घालण्याकरितां ते मला कुरवाळून म्हणाले, उगी; रडूं नकोस अशी वेड्यासारखी; व त्यांनी माझ्या तोंडावरून हात फिरवला. ते जों जों माझी समजूत घालूं लागले, तों तों मला अधिकच गहिंवर येऊं लागला. त्यांनी मला जवळ ओढलें. अगदीं घट्ट हृदयाशीं आवळून धरलें. माझं अश्रूंनीं भिजलेलं तोंड आपल्या दोन्ही हातांनीं वर करून, काय सांगूं! माझा कपाळमोक्ष झाला. पण मला मात्र त्या वेळीं कांहीं समजत नव्हतं. आम्ही घरीं आलों त्या दिवशीं रात्रीं सिनेमाला गेलो. कमी, बगी, सोनूताईच्या बहिणी माझ्याच वयाच्या होत्या, पण माझ्याजवळ भाऊ बसले होते, ते मधूनमधून मला चिमटे काढीत, गुदगुल्या करीत. मला त्या चेष्टांचें त्या वेळी हसूं येत होतं. पण त्या चेष्टेचं कारण समजण्याची प्रौढ बुद्धि मला त्या वेळीं नव्हती.

दुसरे दिवशीं वहिनींची आई अजारी म्हणून तार आली. म्हणून त्या तांतडीनें माहेरीं गेल्या. भाऊंच्या माडीवर मी नेहमीं जात असें. त्यांना चहा नेऊन देत असें. बाकीचीं मुलें त्यांच्या माडीवर जात नसत. भाऊ नेहमीं मलाच बोलावतात, म्हणून कमी व बगी माझ्यावर गुरगुरत असत. एक दिवस सगळी मंडळी कुठें बाहेर गेली होती. मी व बगी लहान मुलांना संभाळण्याकरितां घरीं राहिलों होतों. भाऊ कामावरून आले ते थेट माडीवर गेले. घरांत सामसूम पाहून मला त्यांनीं विचारलं,' अंबू, आज कुठें गेली आहेत मंडळी?' मीं सांगितलं देवाला. त्यांनीं बगीला हांक मारून मुलांना घेऊन समोर खेळावयास जाण्यास सांगितलें. मला त्यांनीं घट्ट धरलें. पुढल्या प्रकारानें तर मीं रडूं लागलें. पण त्या निर्दय मांगानें आपली तृषा भागवण्याकरितां माझ्या कोंडलेल्या जिवाला बिलकूल मोकळें केलें नाहीं. उलट आपले विस्कळित दांत माझ्यापुढें काढीत म्हणाला, अंबू, आवडतों कां मी तुला? मी तुझी पुष्कळ हौस पुरवीन. पातळें आणीन. हें ऐकून मला इतका त्वेष आला.—पुरे मेली कटकट. पुढली हकीकत केव्हांतरी सांगेन.

ज्या भारतवर्षात शिवाजीसारखे नवरत्न जन्माला आलें, लो. टिळकांसारखे थोर कार्यकर्ते आपली कीर्ति ठेवून गेले, त्या वीर पुरुषांच्या पराक्रमाचे पोवाडे ऐकून अंगावर आनंदाचे रोमांच उभे रहातात. तर हल्लींच्या पुरुषांच्या दुष्टवृत्तीच्या वर्णनानें मनस्तापानें अंग थरारतें. आणि असं वाटतें, अशा पुरुषांच्या नरडीचा घोट घ्यावा ! पण तें आम्हां स्त्रियांच्या हातून कसें होणार ? हें कार्य पराक्रमी पुरुषांनीं तेव्हांच करून दाखवलें असतें. आम्ही स्त्रिया कितीही बहकलो तरी फुकटच. आमचं मन लोण्यासारखं वितळतं. आणि त्यांतूनही पुरुषांच्या विवेकबुद्धीला जागृत करणें म्हणजे निव्वळ आंधळेपणाच होय. मला पुष्कळ अनुभव आल्यामळें अंबूताईच्या बोलण्यानें मला कांहींच वाटलें नाहीं. मला त्या नराधमाचा फार राग आला. पुढें काय झालें, मीं त्यांना विचारलें. त्यांची हकीकत ऐकण्यास माझे कान अगदीं टवकारले होते.

त्या पुढें सांगूं लागल्या. " मी दरवाजात बसून रडूं लागलें. मला काय होत होतें तें कळेना. इतक्यांत सोनूताई आल्या. त्यांना मी सोनुअक्का म्हणत असें. सोनूताई येतांच मला रडूं कोसळलें. त्यांनीं मला पुष्कळ विचारलें. मी बोलत नाहीं असें पाहून त्यांचा नाइलाज झाला. रात्री सर्वांची निजानीज झाल्यावर सोनुअक्का आईस म्हणाल्या, आई, मीं उद्यांच नाशिकला जातें. अंबूला घरची आठवण झाल्यासारखी दिसते. ती मघांपासून सारखी रडते आहे. काय होत आहे तें मुळींच समजत नाहीं. त्या दोघी मायलेकींचा संवाद मीं ऐकत होतेंच. बगी ही दिसायला बावळट होती. पण मोठी हुषार होती. ती हंतरुणांत उठून बसली व चुळबूळ करूं लागली. तेव्हां आईनें विचारलें, बगे, झोप नाहीं कां ग येत ? बगी ऊंहूं करून उठून बसली. आई, मीं तुला सांगू का अंबू कां रडते ती. तिला भाऊ कांहींतरीं बोलले असावेत. आईच्या चेहऱ्यावर विचाराची छटा उमटली. आपल्या मुलाचा स्वभाव त्यांना पूर्ण माहीत होता. त्या म्हणाल्या, काय बोलला ग भाऊ

अंबूला ? अगी म्हणाली, तें मला माहीत नाहीं.

" म्हणजे, तूं कुठ गेली होतीस ? "

भाऊ घरीं आल्या वेळीं अंबूजवळ चौकशीं केली, तुम्ही देवाला गेलांत असें अंबूनें सांगितलें. मला भाऊ म्हणाले, सगळीं मुलें घेऊन समोर खेळायला जा. मीं खेळायला गेलें. पुढें काय झालें तें मला माहीत नाहीं.

आईचा चेहरा एकदम काळवंडलेला दिसला. मीं हें सगळं झोपेंचें सोंग घेऊन ऐकत होतें. आई, आपण अशा चिंतातुर कां बसलांत ? अजून तर पुढंच आहे.अम्बूताईंना मीं त्या गृहस्थाचें वर्णन विचारलं. तें ऐकून माझी खात्री झाली. माझ्या मानसिक उपाधींचा विसर न पडल्यामुळें जगांतलं भीषण चित्र ज्यांनीं मला दाखवलं,त्यांनींच अंबुताईंच्या कोवळ्या जीवाचे लचके तोडले. दैवानं उलट खाल्ली कीं, तिथं मोठमोठे तपस्वी सुद्धां हात टेकतात. मग तिथं गरीब बिचाऱ्या परावलंबी स्त्रिया काय करणार ? बिचारीला आकाश कोसळल्यासारखं झालं. अंबूताईला अतिशय गहिंवर आला. तो मनामध्यें दाबून ठेवून त्या पुढें सांगूं लागल्या. माझ्या सुखाचा सुवर्णकळस आज चढणार होता. माझं सौभाग्य सासर पंढरपुरांत होतं. ज्या पुण्यनगरींत महाभक्त पुंडलीकानें मोक्षपद मिळवलं, त्याच पुण्यनगरींत मीं आज प्रथम पाऊल टाकलं.

सुलभाताई, मी एका लक्षाधीशाची सून पण अनाथ होऊन अशी दारोदार भिक्षा मागूं लागलें. मी अनाथ झालें हें मला समजलं सुद्धां नाहीं. मला घरांतून कां घालवून दिलं, हेंहि उमगलं नाहीं. माझ्याच वयाची माझी एक नणंद होती. ती न मी गच्चीवर बसलों होतों. त्याच दिवशीं वन्संचे पतिराज त्यांना न्यायला आले होते. तें एक सुशिक्षित तरुण असून मुंबईचे रहिवासी होते. ते हल्लींच्या विचाराचे असल्यामुळें, एकदम तडक आपल्या पत्नीला भेटण्यास गच्चीवर आले. आम्ही अशा पाठमोरी अगदीं बोलण्याच्या रंगांत आलों होतों. त्यांनीं एकदम वन्संचे डोळे झाकले. मी उठून

तिथून पळ काढला. पण दाराच्या आडून पाहण्याच्या मोह मला आवरेना. त्या दोघांचें विलास पाहून मला भाऊंची आठवण झाली. इतक्यांत भाऊंनी जावईबुवांना हांक मारली. म्हणून वन्संचे पतिराज खालीं गेले. मीं पुन्हां गच्चीवर येऊन उभी राहिलें. मी बोलत नाहीं असें पाहून वन्सं म्हणाल्या, वहिनी, अशी सचिंत काय बसलीस! भाऊ तुझ्याशीं प्रेमानं नाहीं कां वागत? मी लगेच म्हटलं, 'नाहीं. पण असेंच वागणारे सोनुअक्कांचे भाऊ होते.' वन्स चपापून दोन पावलें मागें सरल्या. भयभीत नजरेनें माझ्याकडे पाहून म्हणाल्या, वहिनी, काय म्हणालीस, सोनुअक्कांचे भाऊ! ते तर परपुरुष. तूं व्यभिचार केलास! आमच्या घराण्याला, अब्रूला काळं फासलंस. हें आईला कळेल, कळेल कशाला मींच जाऊन सांगतें. या वयाला इतकं तर पुढें काय करशील? वन्स तिथून निघून गेल्या. मीं विचार करूं लागलें, या माझ्यावर विनाकारण रागावल्या. मीं खरं तेंच सांगितलं. त्यांत माझी काय चूक झाली? झालं. तो संक्रांतीचा संक्रमण आनंदाचा दिवस होता. रात्रीचा दहा अकराचा सुमार असेल, सासुबाईंनीं माझ्याकडून सर्व हकीकत विचारून घेतली. माझ्या अज्ञानपणानें झालेली चूक, पण मला कोणींच क्षमा केली नाहीं. मी खर तेंच बोललें. पण कोणालाच माझी दया आली नाहीं. सासूबाईंनीं मला सांगितलें, जा. चंद्रभागेंत जाऊन जीव दे आणि आपल्या पापाचं क्षालन कर. त्या वेळीं माझ्या बाल मनाला मीं पतित झालें याचा अर्थही समजला नाहीं. पण त्या दिवसापासून मी अनाथ झालें.

बाई, संकटाचे वेळीं जिवाला परमेश्वर आठवूं लागतो. पुढें माझ्यावर बरेच वाईट प्रसंग आले. पण ते विस्तारानें कशाला सांगूं? शेवटी ज्यापासून या आपत्ति ओढवतात, तो केशकलप मी काढून टाकला! अचानक आलेल्या प्रसंगामुळें माझं मन गांगरून गेलं होतं. तें सुखाच्या मृगजळामागून धावूं लागलें. सुख मिळावें अशी दुबळ्या अंतःकरणांत व्यर्थ धडपड आहे. या समाजांतील हीं

गिधाडं स्त्रियांच्या पातिव्रत्याचा स्वाहा करून, त्यांची शीलाची संपत्ति लुटणारीं आहेत. अशाच स्वार्थसाधू लोकांनीं आपलं हें राष्ट्र गजबजलें आहे. त्यांत अनाथ अबलांची फिर्याद कोण घेणार? स्त्रियांचं गृहसौख्य नाहींसं झाल्यावर त्यांचे हाल कुत्राही खात नाही. झालं. मला माहेरीही कोणी नाहीं. अशा परिस्थितींत मला काय वाटलं असेल बरं !

मला कलकत्याहून सिंधू फार अजारी असल्याची तार आली. म्हणून मी प्रमिलाबाईंना ४ दिवस येणार नाहीं हें सांगण्याकरितां गेलें. तो दिवस रविवारचा होता. प्रमिला व भाऊसाहेब मोटारींत बसत असतांना मी लांबूनच पाहिलें. मला असा त्वेष आला, कीं त्या संभावित गृहस्थाची चांगलीच कान उघाडणी करावी ! मी भरकन् पुढें झालें ! पण गाडी निघून गेली. असल्या या विषय-लंपटांना सवाई कोणी भेटत नाहींच कां? या विचारांतच मी चाळींत शिरलें. तो प्रमिलाबाईंचा गडी घरीं होताच. मी तिथेंच एक चिट्ठी लिहून ठेवली, ती अशीः—

श्री. प्रमिलाबाई यांसी–

कांहीं कामाकरितां मी गांवाला जात आहें. तीन चार दिवस मला शिकवण्यास येतां येणार नाहीं.मला क्षमा करा. आपला परिचय नसतांना मी आपणांला एक सूचना देणार आहें. मघांशीं आपण ज्यांच्याबरोबर गाडींत बसलां होतां, त्या गृहस्थापासून संभाळून असावें. ही धोक्याची सूचना भगिनी या नात्यानें देत आहें. आपलें व त्यांचें काय नातें आहे हें मला माहित नाहीं. राग नसावा ही विनंती.

आपली
सुलभा

मीं तिथून घरीं आलें, पण मनाला चैन पडेना. प्रमिलाबाई सुस्वभावी व सुंदर होत्या. पण तें सौंदर्य अशा नराधमाच्या पायीं चुरगाळलें जाणार या कल्पनेनें माझ्या मनाला वाईट वाटूं लागलें.

माझ्या मनांत एक कल्पना आली. प्रमिला कांहीं भोळीभाबडी नाहीं. तिचें वय २२-२३ असावें. तिच्याजवळ जो गडी आहे, तो असाच डाकू दिसतो. आणि आपण ज्या वेळां जातां त्या वेळीं कुणीतरी बसलेलेंच असतें. मी विचारांत इतकी गढून गेलें होतें. कीं गाडीची वेळ झाली तरी मला पत्ता नाहीं. मोलकरणीनें गाडी आणून तींत माझें सामान नेऊन ठेवलं आणि मला हांक मारण्यास वर आली. तिकिट काढलेलेंच होतें. मी गाडींत जाऊन बसलें. तरी माझे डोक्यांत एकच विचार. कलकत्ता स्टेशनवर गाडी थांबली. तरी मला समजलें नाहीं. रमेशचंद्र माझ्या डब्यांत चढले. कोणचें सामान तुमचें असें त्यांनीं मला विचारलें. तेव्हां मीं भानावर आलें. सामानाकडे मीं बोट दाखविलें. रमेशचंद्राला पाहिलें कीं मन पुन्हां बावरेल कीं काय, या भीतीनें मीं त्यांच्याकडे पहाण्याचें मुद्दाम होऊन टाळलें. सामान हमालाचे डोक्यावर ठेवून आम्ही चालूं लागलों. बाहेर गाड्या उभ्याच होत्या. त्यांतून एका गाडींत बसलों. कोणी विशेष असें बोललें नाहीं. थोड्याच वेळांत घरीं आलों. सिंधू बिछान्यावर स्वस्थ पडली होती. मी तिच्याजवळ जाऊन बसलें. पण मला पाहून तिला आनंद झालेला दिसला नाहीं. बरं वाटलं इतकंच. मी बारकाईनें सिंधूकडे पाहूं लागलें. तिच्या डोळ्यावरून मला ओळखूं आलं. सिंधूचें आजारपण तरुण बालिकेच्या विचाराचें होतें.



# ४

मला येऊन आज पंधरा सोळा दिवस झाले. तरी माझ्या निघण्याचा एकही दिवस नक्की ठरेना. शेवटीं एकदांचें ठरलें. सिंधूही माझ्याबरोबर येणार होती. म्हणून तिची मैत्रीण कला तिला भेटण्यास आली होती. दोघीही वयानें सारख्याच. पण फरक इतकाच, कलेवर वैधव्याचें दारुण दुःख कोसळलें होतें. त्या दोघीं एकमेकींजवळ अगदीं मोकळ्या मनानें बोलत होत्या. पण कला बऱ्याच गुप्त गोष्टी सिंधूजवळून चोरून ठेवीत असावी असें वाटत होतें. सिंधूच्या हातांत कांहीं लिहिलेले नोटपेपर्स होते. त्यासंबंधींच त्या कांहींतरी बोलत होत्या. कला म्हणाली,

'सिंधू, मला क्षमा कर. मी तुझ्यापासून मुद्दाम लपविलें नाहीं, तर त्यापासून तुला दुःख होईल म्हणून मी बोललें नाहीं. तुझ्याप्रमाणेंच अरविंदानें मला फसविलें.'

सिंधू आश्चर्यानें म्हणाली, काय माझ्याप्रमाणेंच तुलाही प्रेमाच्या राज्यांतून बाहेर पडावें लागलें? तुझीही निराशाच केली? कलावती,

काय सांगूं? अरविंदांचे ते शेवटचे शब्द माझ्या कानांत सारखे घुमत आहेत. मीं त्यांना त्यांच्या वचनाची आठवण करून दिली. त्यावर ते म्हणाले, "खेळांतलं वचन म्हणजे तूं प्रेमातलं सत्य वचन समजलीस? सिंधू, तूं किती वेडी आहेस! मी तुझ्याशीं लग्न करणार नाहीं. तुझ्या बापाचा पत्ता नाहीं. पण तें जाऊं दे. एक गोष्ट लक्षांत टेव. प्रेम हें पतितांकरितां नाहीं! समजलीस?" असें सांगून विकट हास्य हासून ते मोठ्या तोऱ्यानें निघून गेले.

कलावती, माझी आई मला पुरुषजातीपासून अगदीं अलिप्त रहा असें सांगत असे. पण मीं तिकडे लक्षच दिलें नाहीं. कलावती, माझी आई कर्तबगार असून कलाप्रेमी आहे. त्यामुळें प्रत्येक गोष्टींचा अनुभव घेऊन जगांत ती तावून सुलाखून निघाली आहे. पण हें मला समजलं नाहीं. आईशिवाय या जगांत ममतेचं कोणी नाहीं. कलावती, हे दैवाचे खेळ आहेत. प्रारब्धांत ज्या गोष्टी असतील त्या होणारच.

सिंधू हताश होऊन पत्राकडे पहात होती. तें पत्र म्हणजे अरविंदाची लग्नपत्रिका होती. कलेनें चमकून तिच्याकडे पाहिलें. दोन अश्रुबिंदु सिंधूचे गालावर ओघळले होते. इतका वेळ बाजूला उभी असलेली मी पटकन पुढें झालें व सिंधूला घट्ट हृदयाशीं धरलें व तिचीं लहान मुलाप्रमाणें पटापट चुंबनें घेतलीं! मला गहिवर आल्यामुळें कांहींच बोलवेना. सिंधूला मुंबईला घेऊन जायचें ठरलें. बरोबर रमेशचंद्रही येणार होते. कलावती कल्याणला जायला आमच्याबरोबरच निघाली. आम्ही सर्वजण निघालों. रमेशचंद्रांनीं सेकंडक्लासचीं तिकिटें काढलीं होतीं. सिंधू गाडींत बसतांना म्हणाली, आम्ही लेडीज-कंपार्टमेंटमध्यें बसतों. म्हणजे मोकळेपणानें गप्पा मारूं. रमेशचंद्रांनीं आढेवेढे न घेतां त्यांची निराळी सोय करून दिली. आम्ही दोघेंच त्या डब्यांत बसलों होतों. दोघेंही स्तब्ध होतों. मला वाटे, त्यांनीं सुरवात करावी. पण शेवटीं त्यांनींच सुरवात केली. हातपाय पसरीत व

जांभई देत ते म्हणाले " या दगदगीनें थकलों अगदीं. आतां होत नाहीं बघा यातायात. हिंडून हिंडून पाय थकले अगदीं. "

मीं म्हटलें. " जरा पायाला हात लावूं का ? बोटें मोडलीं म्हणजे तरी जरा बरं वाटेल ! " ते नको नको म्हणत असतां मीं बोटं मोडलीं. त्यांच्या चेहऱ्यावरून त्यांना बरें वाटलें असावें असें दिसलें. ते आपल्याच मनाशीं हसले. त्यांच्या हसण्याचा अर्थ न समजल्यावरून मला कसेंसेंच वाटूं लागलें. त्या वाटण्यांत मान, अपमान, दुःख, सुख, हर्ष, विषाद, त्याग या सर्व भावना एकवटल्या होत्या.

मीं विचारलें, " कां हो, हसलांत कां ? "

रमेशचंद्र माझ्याकडे पहात म्हणाले, " तसं कांहीं विशेष नाहीं. मला या लोकांची गंमत वाटते. मघाशीं ते गृहस्थ आले होते ना ? ते सारखी तुमची चौकशी करीत होते. "

" कोणाची, माझी ? अन ती कशाला ? "

रमेशचंद्र म्हणाले, " होय हो, तेंच तर समजत नाहीं. तुम्ही हॉस्पिटलमध्यें होतां तिथेंच ते डॉक्टर होते. अगदी वेड लागलं आहे तुमच्याकरितां ! "

मला विचारांत पडलेली पाहून ते म्हणाले, ' कां हो, झोंप येते वाटतं ? ' पण माझा गंभीर चेहरा पाहून ते म्हणाले, " अहो, चालायचंच असं. तुम्ही कशाला या लोकांच्याकडे लक्ष देतां ? अहो, या लोकांची खोड मोडायची म्हणजे त्यांच्याकडे ढुंकूनही पहायचं नाहीं. आपल्याला कांहीं काम पडलं तर तें दुसऱ्याकडून करावं. स्वतः भेटण्याच्या भानगडींत पडूं नये, समजलं ? असं वाईट वाटून घेऊं नका. "

असा मला त्यांनीं पुष्कळ उपदेश केला. त्यामुळें मीं इतकें ठरवलें कीं, रमेशचंद्रांचें दर्शन घ्यायचें नाहीं. पण तो निश्चय लवकरच मोडला गेला. आतां तर माझी खात्री झाली. त्यांच्या या सहवासांत त्यांनीं मला चांगलेंच पछाडलें. या गूढ शंकेचें निरसन

कसें करावें ? ज्या ध्यानांत मनुष्य असतो त्याच ध्यानांत सुख-शांतीचा लाभ होतो. माझा स्वतःचा अनुभव तसेंच सांगतो. रमेशचंद्रांचा सहवास मला सुखशांतीचा वाटत होता हें खास. पण मनासारखें होणें अत्यंत दुष्प्राप्य आहे असें म्हणतात, तें कांहीं खोटें नाहीं. आपल्या मनांत एखाद्याबद्दल आपलेपणा असतो. त्याचें रूपांतर स्नेहांत होतें. तेव्हांच भक्तिप्रेम अथवा प्रणयी प्रेम म्हणविलें जातें. मनुष्याच्या हृदयांत प्रेम उत्पन्न होतें, तेव्हां त्याच्या प्रेमाला हृदयांत आश्रय दिला जातो व जेव्हां प्रेम प्रौढ होतें तेव्हां आसरा दूर होऊन प्रेमविना आश्रय कायम राहतो. आणि त्याच्यांतच स्वतःच्या पायावर उभें राहण्याची शक्ति येते. असले अनेक विचार माझ्या डोक्यांत घोळूं लागले. इतक्यांत कुठल्याशा स्टेशनवर गाडी थांबली. तिथेंच माझे विचारही थांबले.

रमेशचंद्रांला गाढ झोंप लागली होती. गार वारा येत होता. म्हणून मी खिडकी बंद करण्याकरितां त्यांचे बेडजवळ गेलें. तोंच त्यांनीं माझा हात धरला व आपल्या जवळ बसवून मला म्हणाले, “ कां, राग आला कां तुम्हांला ! रुसलांत वाटतें. ”

‘ छे, ’ एवढेंच मी उत्तर दिलें व माझा हात सोडवून घेतला व माझ्या जागेवर मी येऊन बसलें. त्यानंतर रमेशचंद्रांनीं मला जगांतील पुष्कळ गोष्टी समजावून दिल्या. मीही विचार केला. आणि माझी खात्री झाली आहे कीं, जग हें प्रामाणिकपणाचें नाहीं. जशास तसें या न्यायानें वागलें तरच जगांत कांहीतरी जगण्याची सोय आहे. आपण इतके दिवस मन मारून हाल सोसले, त्याचा उपयोग काय झाला ? रमेशचंद्रांचें मन मी दुखविलें. जगांत अशा अनेक पुरुषांना मी वाटाण्याच्या अक्षता दिल्या. कित्येकांच्या भावनांचा चक्काचूर केला. आणि माझ्या मनाला—मला मन नसेल कां? भावनाही असतीलच. पण मन डळमळूं द्यायचें नाहीं, असा मी विडाच उचलला. मी विचार केला, आपण जरा वेळ सिंधूकडेच जावें. हळूंच कंपार्टमेंटचें दार उघडून बाकावर न

बसतां हळूंच खोलींत बसलें. कारण मला गुपित ऐकण्याची फार खोड होती. मोठ्या मजेच्या गोष्टी असत.

" कलावती, आईला सांगून आपली सोय इकडे करून घेतली, हें बरं झालं, नाहीं ? मोकळ्या मनानें वडील माणसांदेखत बोलतां येत नाहीं. सांग, अगदीं खरं सांग. तुझी व अरविंदाची गांठ कुठें पडली ? कांहीं लपवून ठेवूं नकोस. सगळं सगळं सांग. "

"सिंधूताई," कलावती म्हणाली." मला ज्या बाईनं संभाळलं ती एक नायकीण होती. पण वर्तणूक गृहस्थाच्या बायकोला शोभेशी होती. तिला दोन नाती होत्या. थोरलीचें नांव कुंवर. तिची व अरविंदांची ओळख होती. ते तिच्याकडे नेहमीं येत असत. अरविंद माझ्याकडे पहात असत, एवढ्यावरच कुंवर माझा राग राग करीत असे. त्या वेळीं माझें वय १६ वर्षांचें होतें. त्या बाई माझ्या लग्नाची पुष्कळ खटपट करीत असत, पण माझी जातगोत माहीत नसल्यामुळें त्यांच्या खटपटीला यश येत नसे. सिंधूताई, मी कुणाची कोण हें कुणालाच माहित नाहीं. मी ४ महिन्यांची असतांना बाईंना दत्तमंदिरांत सांपडलें. माझ्या डोकीच्या गलुत्यांत माझं फक्त नांव लिहिलं होतं.तेव्हांपासून बाईंनी माझं पालनपोषण अगदीं पोटच्या मुलीप्रमाणें केलं. मी ब्राह्मणाची असावी या कल्पनेनें बाईंनी मला ब्राह्मणपद्धतीचें गृहशिक्षण दिलें. पुढें थोड्याच दिवसांत त्यांच्या या खटपटीला यश येऊन एका गरीब ब्राह्मणाशीं माझं लग्न झालं. मनाविरुद्ध लग्न म्हणजे सुंदर शालजोडीला दिलेल्या ठिगळाप्रमाणें होय. तरी त्यांतही मी सुख मानीत असें. पण दुर्दैवानें तें नाहींसें झालें. म्हणजे ते मेले नाहींत हो ! पण मी कुलहीन, आईबापांचा पत्ता नसलेली, म्हणून माझ्या सासरच्या माणसांनीं धिक्कार केला. माझे पतिराज बावळे होते. मी परत बाईकडे आलें. पण कुंवर मला ठेवून घेण्यास तयार नव्हती. बाईंनींही पोक्त विचार करून माझी निराळी व्यवस्था करून दिली व कुंवरच्या वागण्याला कंटाळून त्या तीर्थाटणीं निघून गेल्या.

मी ज्या वेळीं इंटरला बसलें, त्या वेळीं अरविंदही इंटरला प्रोफेसर होते. ते मागें कुंवरकडे येत असत, तेव्हां माझ्याकडे पाहून इतके गोड हांसत कीं, मलाही त्या हसण्याचा आनंद होत असे. मी तुझ्याकडे येऊं लागलें त्या वेळेस तुझी व त्यांची मैत्री माझ्या पाहण्यांत आली. त्यानंतर ते माझ्याशीं बोलूं लागले. ते व मी पुढें पुढें फिरायलाही जाऊं लागलों. एकदां मी व ते चित्रपट पाहण्यास गेलों. चित्रपट सुटल्यानंटर आम्ही परत घरीं आलों व खूप खूप बोललों. त्याच वेळेस अरविंदानें मला पुनर्विवाहाचें वचन दिलें. पण त्याच वेळेस ही गोष्ट तुझ्याजवळ न बोलण्याविषयीं त्यांनीं मला बजावून ठेवलें होतें. सिंधू ! तूं मला क्षमा कर. म्हणून मीं ही गोष्ट तुझ्यापासून लपवून ठेवली होती.

सिंधूः—"बरं पण तूं कल्याणला जाणार आहेस तें कोणाकडे ! वेडे, बोलत कां नाहींस ? मोलमजुरी करून रहायचं ठरवलं आहेस वाटतं."

"सिंधू मीं या पत्करलेल्या मार्गाबद्दल मला यत्किंचितही खेद वाटत नाहीं !"

"कले, हा तुझा मोठा अन्याय होईल. तरुण मुलींनीं मोल-मजुरी करणं, त्यांतून शिकलेल्या मुलींनी— "

"कसलं आलं आहे शिक्षण ? सिंधू, आपण पोकळ अभिमानानें शिक्षणाच्या गर्वानें चढून जाऊन नीतीचीं बंधनें झुगारून दिलीं, म्हणून हे परिणाम आपल्याला भोगावे लागत आहेत. वडील माणसांच्या सांगण्याकडे लक्ष दिलें असतें तर हा तळमळणारा जीव आंसवें ढाळीत कां बसला असता ? सिंधू, तूं हुषार म्हणून त्या मांगाच्या पाशवी कृत्यापासून सुटलीस ! पण मी ?"

"काय तूं कला, काय सांगतेस हें ? हाय रे दैवा ! कलावतीं, काय ग केलंस हें !"

त्या दोघी मैत्रिणी किती तरी वेळ एकमेकांकडे पहात विचार करीत बसल्या होत्या. मीं कलेच्या पाठीवरून हात फिरवला.

" भिऊं नकोस बेटा. अनाथाचा नाथ परमेश्वर खात्रीनें तुझें संकट दूर करील " असें समजावून सांगितलें. इतक्यांत कल्याण स्टेशन आलें. गाडी थांबली. प्रभाकर स्टेशनवर आला होता. कलेनें त्याला पाहतांच हातानें इषारा दिला. प्रभाकरानें सिंधूला पाहतांच नमस्कार केला. रमेशचंद्रांनीं विचारलें, ' सिंधू, तूं ओळखतेस का यांना ? "

"हो. आमच्या कॉलेजांत हे सायन्स शिकवण्यास प्रोफेसर होते."

रमेशचंद्रांनीं हमालाला सामान उतरवण्यास सांगितलें. कला खालीं उतरली. सिंधूही उतरली. कला उतरतांना म्हणाली, ' आई, येतें मी आतां. ' मीं तिचा निरोप घेतांना कांहीं नोटा तिच्या हातांत देत म्हटलें, " पत्र पाठवीत जा बरं का ? कांहीं कमीजास्त झाल्यास कळव. मला माझी सिंधू आणि तूं अगदी सारख्याच आहांत बरं कां ? तुझा पत्ता सिंधूजवळ दिलाच असशील. नसल्यास देऊन ठेव हं ! "

कलेनें मागें वळून पाहिलें, तर प्रभाकर उभाच होता. त्याने हें सर्व संभाषण ऐकलेंच होतें., चटकन तो पुढें झाला व त्यानें आपल्या नांवाचें व्हिजिटकार्ड माझ्या हातीं दिलें. इतक्यांत गार्डानें शिटी दिली. सिग्नल खालीं झाला. गाडी चालू झाली. सिंधू व मी फ्लॅटफार्मवर उभ्या असलेल्या कलेकडे स्नेहार्द्र डोळ्यांनीं पहात होतों. अरविंदानें केलेल्या तिच्या शोचनीय स्थितीमुळें पुरुषांच्या विषयींचा तिरस्कार सिंधूच्या चेहऱ्यावर स्पष्टपणें दिसत होता. ती म्हणाली, " आई, पुरुषासारखी नीच जात जगांत कुठलीच असणार नाहीं ! "

मीं म्हणालें, " बाळ, कांहीं चांगलेही धर्मवीर जगांत आहेत. पण ते फार थोडे आहेत. त्या दुष्टांचा खेळ होतो, पण त्यापासून स्त्रियांना किती यातना भोगाव्या लागतात याची त्यांना कल्पना नसते. " इतक्यांत गाडी थांबली. आम्ही खालीं उतरलों. सामान हातांत घेऊन ट्रामनें घरीं आलों. लौकर सगळं आटपून मीं माझ्या

खोलींत गेलें. सिंधू पिक्चर पाहण्यास गेली होती. मला अगदींच करमेना, कांहींतरी हरवल्यासारखें वाटत होतें. 'कल्याणला रमेशचंद्र कशाला बरं आले असतील? पण मी कसं विचारलं नाहीं? मग मला आठवलं. त्यांनीं माझ्याकडे पाह्यलं सुद्धां नाहीं. हें व्यवहारी माणसाला शोभेसं नाहीं.' एक ना दोन, एकदां तिरस्कार एगदां राग! अशाच कांहींतरी कल्पनेनें ग्रासलेल्या मनाला शांत करण्याचा मीं बराच प्रयत्न केला; पण व्यर्थ. त्या रात्रीं मला झोंप आली नाहीं. मन उदास झालें होतें, त्यामुळें सकाळीं उठण्यास उशीर झाला. गड्यानें माझ्या हांतांत एक जाड पुडकें दिलें. तें एक पाकीट होतें. पण अक्षर अनोळखी होतें. फोडावें कीं न फोडावें या विचारांत मीं कितीतरी वेळ बसून राहिलें. शेवटीं मीं तें फोडलें. सही पाहतांच इतका वेळ विनाकारण घालवल्याबद्दल मला फार वाईट वाटलें.

ता.........

सुलभाताई, नाहीं—मी आपल्याला आतां एकवचनानें संबोधितें. ताई, या अभागी भगिनीला तूं सावध केलेंस. पण माझें दैव झोंपी गेलें, त्याला तूं काय करणार? दैवीं असेल तें चुकत नाहीं. ताई, माझी कर्मकहाणी वाचून तूं माझा तिरस्कार करशील. पण मीं नीतिबंधनें झुगारून दिलीं. विजयाला पायाखालीं तुडवलें. उनाड मैनेप्रमाणें वागलें. म्हणून मला योग्य शासन मिळालें. भाऊसाहेबांनीं मला जागें केलें. म्हणून मी त्यांची फार आभारी आहें. माझं लग्न झालं त्या वेळेस मीं तेरा वर्षांची असेन. पण कांहीं कारणावरून माझी आई मला सासरीं धाडत नसे. त्या वेळेस आम्ही कल्याणला एका चाळींत रहात होतों. माझा सारा दिवस खेळण्यांत जात असे. माझ्या खेळकर व स्वैर वृत्तीला आईकडून कधींच प्रतिबंध करण्यांत आला नाहीं. मीं अगदीं पांखरासारखी स्वतंत्र होतें. माझ्या मनावर कुणाचाच ताबा नव्हता. मला हार्मोनियम शिकण्याचा अतिशय नाद. आमच्या शेजारी एक क्लास होता. तिथें मी पेटी शिकण्यास जात होतें.

त्या प्रसंगाची आठवण झाली कीं अजूनही मनाला संताप येतो. माझ्या मोकळेपणाचा फायदा मास्तरांनीं घेतलाच. झालं. चाळींतील लोक एकमेकांत कुजबुजूं लागले. सासर गांवांतच असल्यामुळें तिकडेही जनवार्ता गेलीच. त्यांनीं मला तिकडे नेलें. आईकडे येण्याची बंदी झाली. सासुरवास होऊं लागला. दोन दोन दिवस उपाशीं रहावं लागलं. माझे पति निरुद्योगी असल्यामुळें मला मोलकरणीप्रमाणें वागविण्यांत येत असे. मला हा त्रास सहन होईना. सगळ्यांचा डोळा चुकवून मीं पळून आलें. दोन दिवसांत जरा बरें वाटूं लागलें. ही गोष्ट आईच्या लक्षांत आली. तेव्हां तिनें मला प्रेमानें जवळ घेतलें व माझी परोपरीनें समजूत घालून मला फिरून सासरीं पोहोचवलें. माझा आनंद मावळला. माझ्या मनावर पेटीमास्तरानीं चांगलाच पगडा बसविला होता. मी त्यांची चोरून भेट घेऊं लागलें. याची शंका घरांतल्या मंडळींना आलीच. एके दिवशीं त्यांनीं मला घराबाहेर घालवून दिलें. माझ्या लहान मुलाला—प्रभाकराला मजबरोबर दिलें नाहीं. माझी आई दुःखानें चूर झाली. जगांत हात असलेल्या विटंबनेला कंटाळली. एके दिवशीं ती मला निजल्याजागीं सोडून गेली.

आम्हीं या वेळेस बिऱ्हाड बदललें होतें.बिऱ्हाड सोडतेवेळेस मीं त्या मास्तरांना सांगितलें,आपल्याला कुठंतरी गेलं पाहिजे. माझ्या चिन्हां-वरून माझ्या आईला लवकरच कांहींतरी शंका येईल. पण त्यांच्या मना-वर याचा परिणाम कांहींच झाला नाहीं. शेवटीं कंटाळून मीं कुठंतरी जायचें ठरविलें. एका लहान खेडेगांवांत गेलें. तिथें जयंतीबाई माझ्या सासरच्या नात्याच्या होत्या.त्यांनीं मला एका पाटलाच्या घरीं ठेवलं. त्याशिवाय मला गत्यंतरच नव्हतें.पण त्यांनीं मला आधींच बजावलें होतें, 'तुला होणाऱ्या अपत्याचा तूं त्याग केला पाहिजेस.' तेंही त्यांचं म्हणणं मीं नाइलाजानं कबूल केल. त्या वेळीं मीं १७वर्षांची होतें; पण सत्तर वर्षें जगूनही जितका अनुभव येणार नाहीं इतका त्या वेळीं मला आला होता. कोणत्याही स्त्रीवर जो प्रसंग येऊं नये

तो माझ्यावर आला होता. मीं बाळंत झालें. मला मुलगी झाली. माझ्यानें तिचा त्याग करवेना ! मी जयंतीबाईना नकार दिला. तेव्हां त्यांनीं मला साफ सांगितलं, ' याच पावलीं तूं चालूं लाग ! '

मला पोटाची भ्रांत पडूं लागली. मी शेतांत लहान लहान कामें करावीत. ओला कोरडा घांस खावा. पण तेंही माझ्या दैवाला सहन झालें नाहीं. मीं पुढें फार अशक्त झालें. मला ताप येऊं लागला. तरी सुद्धां मीं तशीच शेतांत काम करीत असें. दुर्दैवानें पिच्छाच पुरविला. मी भयंकर आजारी पडलें. पाटलांनीं मला औषध देऊन बरें केलें याचा फायदा घेऊन त्यांनीं औषध दिल्याचा मोबदला मागितला. मीं त्यांच्या पुष्कळ विनवण्या केल्या. रडलें, पायां पडलें, पण त्यांना दया आली नाहीं. माझ्यासारख्या स्त्रियांना अशाच अडचणींमुळें आपलें शील व आपला पोटचा गोळा वाऱ्यावर टाकावा लागत असेल, पण त्यामुळें आपलें मातृपद किती निंदास्पद होतें याची त्यांना कल्पना नसेल काय? पण दैवापुढें काय करणार? मीं माझें अमोल रत्न एका शहरांत दत्त-मंदिरांत टाकलें. मेनकेनें शकुंतलेला रानांत झाडाखालीं टाकलें व मी माझ्या कलेला देवापुढें टाकलें। माझ्या कलाप्रेमामुळें ही कला मला प्राप्त झाली होती, ती माझी कला मीं सोडून दिली, व त्याचबरोबर स्त्रीत्वाचा विनय झुगारून दिला ! मुंबईस मी माझं बिऱ्हाड थाटलें !

मुंबईच्या एवढ्या वातावरणांत मी एकटीच. तेव्हां माझ्याभोंवतीं स्त्रीपुरुषांचा जमाव जमूं लागला. त्यामुळें माझ्या चैनीला अगदीं ऊत आला ! मला खूप पैसे मिळूं लागले. नवीन नवीन मित्र-मंडळी येऊं लागली. त्यांतच भाऊसाहेब मला भेटले. त्यांना तर माझें वेडच लागलें होतें. घरांतील प्रत्येक खोली सुंदर वस्तूंनीं सुशोभित केली होती. अल्लाउद्दिनाला, पद्मिनीला त्या अद्‌भुत गुहेंत पहातांना जसें वाटलें असेल, तसंच त्यांना वाटत असावं. जरीचीं लुगडीं, दागिने, कितीतरी मौल्यवान वस्तूंचा भरणा भरला

होता. हें कुठून आणलं, हें कुणाचं आहे, याबद्दल ते मला कधीं चुकून सुद्धां विचारीत नसत. चारपांच वर्षें चैनींत निघून गेलीं. त्याच वेळीं मीं तुमची शिकवणी ठेवली होती. तुमचा तो इषारा मला मिळाला, मीं त्याच दृष्टीनें भाऊसाहेबांच्याकडे पाहूं लागलें; तों माझें मलाच कळेना. माझ्यावर अनेक पुरुष मोहित असतां मी यालाच कां धरलें आहे ? असें माझें मन मला विचारूं लागलं. शेवटीं मी जिवाला कंटाळलें. माझं मन उदास झालें होतें, म्हणून मीं परमेश्वराची करुणा भाकावी या उद्देशानें पंढरपुरास गेलें. या भयाण भूतकाळाच्या अंधकारांत मी किती दिवस कंठणार ? मी निर्दोषी आहें. बाई, कलेचं प्रेम असणं म्हणजे कांहीं पाप नाही. पण निसर्गानंच स्त्रीला दुबळी बनवली आहे, त्यामुळें अमंगलतेचा कलंक स्त्रीला लागतो. या अन्यायी जगाला मीं कंटाळलें. आपणाला हें पत्र पोहोंचण्यापूर्वीच मला चंद्रभागेनं पोटांत घेतलं आहे."

माझ्या डोळ्यापुढें अंधेरी आली. मला कांहींच सुचेना. मी ते पत्र पुरें केलें व दुसरें उचललें. तोंच माझ्या हृदयांत धडकी भरली तें सिंधूचें अक्षर होतें. मी भरकन पत्र फोडून वाचूं लागलें.

**मनीं एकसे । वर्तन पिसें । एकदां फसे । पुन्हा न मिळे । हृदयांत धडधडे । नेत्रांतुनी अश्रु गळे । कुसुम तोडलें । पुन्हा न जडे । तारा निखळे । भूमिकडे । प्रियाविण ही सुकली कळी । व्यर्थ बिचारी पडत धुळीं ।**

आजवर मीं पुष्कळ ऐकलें कीं प्रेमामुळें मनुष्याची स्थिति विलक्षण होते. आज मीं तें स्वतःच अनुभवीत आहे. माझ्या मनांत तरंगणाऱ्या भावनांचें वर्णन या काव्यांत उतरलें आहे. पवित्र प्रेम हें ईश्वराच्या आशीर्वादानं पुनीत झालेलं असावं. माझा जन्मच मुळीं वाईट. माझ्या नशीबीं सारा दुःखाचा काळोखच पसरला असावा असं वाटतं. केव्हां उजाडेल कांहीं कळत नाहीं. विचार

करकरून पाहिलं. माझ्या जन्मामुळें तुझ्यावर ओढवलेलें संकट मी विसरलें नाहीं. ‘ पुरुषांच्या कपटजालांत सांपडूं नकोस ’ हा मला केलेला उपदेश कितीतरी अनुभविक आहे. पण मीं तोही ऐकला नाहीं. जिच्या रक्तावर मी पोसलें, जिनं माझ्याकरितां सर्वस्वाची होळी केली, मोठमोठ्या वैभवाला झुगारून दिलं, ती माझी आई तूं ! दयेची देवता व धर्माची मूर्तिमंत अभिमानी, म्हणूनच आज-पर्यंत समाजांत मान मिळवून राहिलीस. तुझी मुलगी होण्यास मी मुळींच लायक नाहीं. आतां मात्र मला माझ्या निष्काळजीपणाचा कंटाळा आला. आई, मला क्षमा कर. मी कृतघ्न आहे. माझी अगदीं काळजी करूं नकोस. मी कुठंतरी आहे.

तुला दुःख देणारी
सिंधू

माझ्या हातांतून पत्र केव्हांच गळून पडलें. मी कसाबसा धीर धरून माझ्या खोलींत गेलें. ‘ काय झालं हें सिंधू, सिंधू ! ’ मला रडें कोसळलें. ‘ सिंधू, माझी केवढी निराशा केलीस ? ’

ईश्वराची लीला कुणालाच कळणार नाहीं. मनुष्यप्राणी उगाच सुखासाटीं धडपडत असतो. काल काय झालं, आज काय होणार आहे, उद्यांचा दिवस कसा जाणार, अशा रात्रंदिवस चिंतेनं मनुष्याचें जीवन खलास होतें. भावी सौख्याच्या आशेनं मन डोलूं लागतें, पण तें सौख्य काळाच्या अति घोर हृदयांत लुप्त झालेलें असतें. मनुष्य कितीही शूर असला तरी वात्सल्यप्रेमाच्या निराशेनें त्याचे अंगीं दौर्बल्य येऊं लागतें. मातृप्रेम जगभर व्यापलें आहे. पुरुषानें जर स्त्रीला विचारलं कीं तुला कोणतं प्रेम श्रेष्ठ आहे? तर ती सांगेल मातृप्रेम श्रेष्ठ आहे. हें सांगणंसुद्धां कठीणच. तितकेंच त्यांतील गुणदोष काढणं कठीण.

“ सिंधू, जगाच्या अन्यायाशीं या क्षणापर्यंत मी झगडत आलें. अंतर्मामीं मला शांति नाहीं. मनाची ओढ धावत्या प्रमाणांत, पण त्या धावत्या मनाला आजपर्यंत मीं गवसणी घालीत आलें. खुळें

मन सुखाच्या आशेनं गगनांत भटक्या मारीत फिरूं लागलं. पण या जगाच्या बाजारांत सुखाचा व्यापार मला तुझ्याशिवाय कुठेंच दिसला नाहीं. मी तुला सुखी करण्याकरितां काळ्याकुट्ट अंधकारातून, काट्याकुट्यांतून ठेंचाळत दुःखाशीं टक्कर देत असतां मला वात्सल्यप्रेमाच्या भुकेनं व्याकुळ केलंस. मन भावी सुखाचे मनोरे बांधीत असतां, माझें हृदय फाडून चिंधड्या कीं ग केल्यास ! हृदयावर झालेली ही खोल जखम इतकी ठणकत आहे ! सुखाच्या तृषेमुळें घसा कोरडा पडला आहे. तरी पण ही सैतानी आशा माझा पिच्छा पुरवीत आहे. माझ्या डोक्याच्या शिरा ताडताड उडूं लागल्या. जीव गुदमरून गेला. मनाचा कोंडमारा इतका झाला आहे, कीं तो माझ्यानं आतां सहन करवत नाहीं. आजपर्यंत शरीराला कष्टविलें, नानातऱ्हेचें दुःख भोगलें, पण एकाच आशेवर मीं जिवंत राहूं शकलें. ती कोणती आशा ? तुला सौख्यमेरूवर बसलेली पाहणें. पण तेंही माझ्या दैवानें मला लाभूं दिलें नाहीं. आतां मात्र पराकाष्ठेनें पवित्र राखलेल्या अंतःकरणांत, माधवा ! तुझे चरण लपवून ठेवले आहेत !"

" देहाचं विसर्जन होतांना सिंधू, इतकच सांगतें, जगाचा व्यापार पुरुषांच्या भस्मासुरी वृत्तीवर चालला आहे. पुरुषांच्या कपटी भाषणांत प्रेम हे नुसते हवेवरचे शब्द आहेत. प्रेमाची भूक प्रथम पोटाला लागते. आईच्या उदरीं वस्ती करून तिच्या स्तनांतून अमृततुल्य मधुर दुग्ध पिऊन प्रेमाची तृषा प्रथम पोटालाच भासते. म्हणजे जगाचा हा अट्टाहास पोटासाठींच आहे, पोटाची ब्याद मिटवायला जालिम विष घेतल्यास एका क्षणांत पोटाचा व्यापार देहासह शांत होईल. मनुष्य जन्माला येतो, तो केवळ पोट भरण्याकरितांच कां ? नाहीं. मनांत मोठी महत्वाकांक्षा बाळगून ती तडीला नेऊन, जगांत कीर्ति मिळवण्याकरितां त्याचा जन्म असतो. बाळ, तूं,अजून लहान आहेस. तुला जगाचा अनुभव नाहीं. लो. टिळकांसारखं तेजस्वी नररत्न मायभूमीवर क्वचितच दृष्टीस पडायचं.

तुला एवढ्यांत कल्पना होणार नाहीं. अंतःकरणाच्या कपाटांत दडून बसलेली ही मोहिनी, आणि नवीन ज्ञान, नवा संसार व त्याकरितां लागणारी साधनसामुग्री, त्याकडे धांव घेणारी ती आशा, त्या आशेला दूर लोटून जगाच्या मोहापासून तूं अलिप्त राहून माझी अपुरी राहिलेली इच्छा तूं पुरी करशील, अशी माझी खात्री होती. सिंधू, आर्य स्त्रीला अनुसरून तूं वाग. आर्य स्त्री ही वंदनीय विभूति आहे. राष्ट्रकल्याणाचा पाया रचण्यास दिव्य शक्ति लागते. ती शक्ति गृहदेवता, वीरकन्या, वीरमाता यांच्या अंगीं असावी लागते. हा संदेश जगताला तूं पटवशील.

जुन्याचा त्याग करून नवीन युगाप्रमाणें चालणारी ही तुझी आई आयुष्यभर सुखाला अंतरली. खोट्याचा पाडाव करण्याकरितां आयुष्यभर झगडली. पण आज माझा मनोरा ढांसळला व हा जीव स्वतंत्र झाला. पण लवकरच कळून आलें कीं, पवित्र मनाला जगाच्या बाजारांत फुटक्या कवडीची किंमत नाहीं. आजकाल वरवरची चकाकी दिसणारी तुकतुकीत कातडी माणसाला भुरळ पाडते. आता मी जगाच्या अंतापर्यंत रडत राहिलें, तरी माझे अश्रु पुसण्याकरितां कुणीही पुढें सरसावणार नाहीं. उलट आपल्या समाजांतील आबालवृद्ध ‘ पतिता, पतिता ’ म्हणून माझा धिक्कार करतील ! कुलटा, वेश्या, अशा शेलक्या शब्दांनीं माझी निर्भर्त्सना करतील आणि मजवर ब्रह्मांड कोसळेल ! मग सिंधू, तुला कोण पोटाशीं कवटाळील ? सिंधू, आई ही आपल्या अपत्याचें कवच असते. पति हा पत्नीचा रक्षक असतो. तसेच पत्नी ही पतीची सावली असून पतीच्या कार्यांत साहाय्य करणारी त्याची ती सहकारी असते. पुरातन कालीं स्त्रियांना जो मान मिळत असे, तो मान पुरुषांनीं स्त्रियांना दिला, तर भूतकालीन गोष्टीप्रमाणें पुनः आपल्या देशाच्या भविष्यकालांत स्त्रिया तेजस्वी दिसूं लागतील व घरोघरीं नंदनवनें बनतील. पण हें जगाला पटणार कसं ? मनाची भोगलालसा, महादेवाला सर्पानें वेष्टिल्याप्रमाणें, स्त्रीपुरुषांच्या

शरिरांतून थैमान घालीत आहे. म्हणून या आंधळ्या कोशिंबिरीचा डाव असाच चालायचा. मी आतापर्यंत अनाथ झालेल्या स्त्रियांच्या आयुष्यांतील घडामोडीच पाहात गेलें. ते माझ्या मनाला तरी पटलं कां ? आमचे वडील एक श्लोक म्हणत असत त्याची मला आठवण झाली.

**सुकन्या तशा धन्य माता भवाच्या ।**
**मना आत्मनादीं नको विषयांच्या ॥**
**रहा साधुसंगें, सदाचार पाळ ।**
**वसो देवभक्ती, नको अन्य चाळ ॥**
**मना धरीं विश्वास तारी विवेक ।**
**असे आत्मविश्वास साफल्य एक ॥**
**जरी सर्व आयुष्य जावें सुखानें ।**
**गुरूची अनुज्ञा तरी पाळिल्यानें ॥**
**सुखें येत स्वर्गींचीं नानापरींचीं ।**
**मला साक्ष आली पुरेपूर याची ॥**

मी सुकन्या होतें, पण सुगृहिणी होऊं शकलें नाहीं. सुकन्या आणि सुमाताच माहेरसासरला श्रेष्ठत्वाला पोंचवितात. मीं काय केलें ? दोन्हीं नांवें घालवलीं. अन् पश्चात्तापदग्ध अंतकरणानें रात्रंदिवस तळमळत असलें.

---



उथळ्या स्त्रीजातीला निर्जीव शब्दांना जिवंत सामर्थ्य देणारे तरुण जादुगार, आज शक्य वाटणारी पण उद्यां अशक्य होणारीं सूर्याच्या किरणांनीं आकाशाच्या चित्रपटावर दिसणारीं मनोहर दृश्यें पण चंद्राच्या रजत रसानें काळ्याकभिन्न मेघांच्या गडगडाटांत नर्तन करणाऱ्या विद्युल्लतेचे विचित्र विलास क्षणभंगुर अशा मनःस्थितींत मीं प्रमिलाबाईचें पत्र घेऊन कल्याणला जाण्याचें ठरवलं. लगेच उठून तोंड साफ केलं. चहा घेतल्यावर बरीच तरतरी आली. जाण्याच्या तयारीला लागलंच पाहिजे. आता दिरंगाई करून उपयोगी नाहीं. वात्सल्यप्रेमाच्या आघातांनीं व होणाऱ्या वेदनांनीं सर्व आंग कापत होतें. तशाच स्थितींत मी कल्याण लोकलनं कल्याणला गेलं. पण तिथं प्रभाकर दिसला नाहीं. आता याला शोधावं तरी कुठं अशी मला चिंता पडली ! आपलं कार्य सिद्धीला न गेल्यामुळं मी अधिकच थकून गेलं. शेजारी चौकशी केली, तेव्हां प्रभाकर माथेरानला गेले असं कळलं. मीं माथेरानला जायचं

ठरवलं. हातीं घेतलेलं कार्य तडीस न्यायचं हा माझा निश्चय. मीं माथेरानच्या गाडींत बसलें. त्या डब्यांत फक्त एकच गृहस्थ बसले होते. बसले होते म्हणण्यापेक्षां झोपले होते, हेंच म्हणणं जास्त शोभेल. कसल्यातरी स्वप्नामुळें उठून ते गडबडीनें इकडे तिकडे बाहेर पाहूं लागले. नंतर सावरून बसून मला त्यांनीं विचारलें.,

" कुठल्या हॉटेलांत आपण उतरणार? का तेथें बंगला वगैरे आहे तुमचा ? "

त्यांचं हें शिष्टपणा सोडून विचारणं मला बिलकूल आवडलं नाहीं. मी खिडकींतून बाहेर पाहूं लागलें. बाहेरचा सुंदर देखावा पाहून माझं मन गुंगून गेलं. कालपासून आलेला डोक्याचा शीण बराच कमी झाला. त्या गृहस्थाला कुठें तरी पाहिल्यासारखं वाटलं म्हणून त्याच्याकडे बघितल्यासारखं न दाखवतां त्याच्याकडे पाहूं लागलें. त्याचं माझ्याकडे लक्ष नव्हतं. तो कांहीं कागदपत्रं चाळीत होता. हो, मला आठवलं. तोच तो भयंकर गृहस्थ. 'अगबाई, काय हा भयंकर मनुष्य !' माझ्या तोंडून हे उद्गार सहजच घाबरून बाहेर पडले. त्यानें एकदम वर पाहिलें. तों त्याचे ते डोळे अगदीं लालभडक ! मला वाटलं खिडकींतून उडी टाकावी !

इतक्यांत तो म्हणाला, " सुलभाताई, घाबरूं नका ! मी त्यावेळीं तसा होतों, पण आतां तसा नाहीं. तुम्ही माझ्या बहिणीप्रमाणें आहांत. मी माथेरानला असतों. तिथें माझं एक हॉटेल आहे. म्हणून मी आपणांला विचारलं. पण आपली बोलायची इच्छा दिसली नाहीं. आणि तेंही खरं आहे. मी पूर्वीं तसाच होतों. पण मी जात्या तसा नव्हतों. या समाजावर चिडून मीं तसं करूं लागलों. पण लौकरच या कृत्याचा मला कंटाळा आला आणि अगदीं थोड्याशा भांडवलावर मीं इथं हॉटेल काढलं. कसंतरी पोटापुरतं चालतं. "

मी कांहींच बोलत नाहीं असं पाहून तो म्हणाला. " अजून माझ्यावर तुमचा विश्वास बसत नाहीं. मी माझ्याकडून

प्रयत्न करतों. कारण माझ्यावर उपकार करणाऱ्याचं समाधान करणं हें माझं पहिलं कर्तव्य आहे. मी आपली गांठ घेण्याकरितां बरीच धडपड केली. पण आपण तें घर सोडल्याचं समजलं. पुन्हां हॉस्पिटलमध्यें गेलो, पण फुकटच. पुन्हां आपण दिसला नाहींत. खरोखर जर तुम्हीं मला त्या वेळेस लपवलं नसतं, तर मी या जगांतून काय-मचा नाहींसा झालों असतों. खरंच, आपणच मला पुर्नजन्म दिलांत." असें म्हणून त्यानं माझ्या पायावर डोकं टेवलं व तो रडूं लागला. मी त्याला उटवलं व रडूं नका म्हटलं. मला त्या रात्रीची आठवण झाली. मी त्याला विचारलं, " ती खुनी स्त्री कोण होती, तें ऐकण्याची मला फार जिज्ञासा उत्पन्न झाली आहे. " त्यानें रुमालाला तोंड पुसून म्हटलें, " आई, ती गुप्त हकीकत कुणालाच सांगितली नाहीं. पण तीच मी तुमच्याजवळ, माझ्या उपकारकर्तीजवळ सांगायला मला कांहींच शंका वाटणार नाहीं. " इतक्यांत गाडी कुठल्याशा स्टेशनला थांबली. कालपासून कांहींच अन्न पोटांत नसल्याकारणानें माझ्या घशाला कोरड पडली होती. मी सोडा मागवला. एक ग्लास त्या गृहस्थाला दिला व दुसरा मीं घेतला. काय असेल तें असो, माझ्या हृदयांत एकाएकीं विलक्षण उल्हास-वृत्ति जागृत झाली. मीं ग्लास परत दिला व त्याला विचारलें " सांगा आतां तुमची हकीकत. "

तो म्हणाला ' तुम्ही मला असं वचन द्या, कीं ही गोष्ट मी कुणाजवळ फोडणार नाहीं. ' मी 'नाहीं' असें म्हणतांच त्यानें सांगायला सुरवात केली. " ऐका तर आतां. ती एक राणी होती."

मीं आश्चर्यानें विचारलें " काय, राणी ? "

" हो राणी. पण कृति मात्र कुलटेला सुद्धां न शोभणारी. "

मीं विचारलें, " पण तुमची आणि त्या राणीची गांठ कुठें पडली ? "

त्यावर तो म्हणाला, " मी तुम्हांला सर्व हकीकत अगदीं थोड-

ल्यांत सांगतों. मी मूळ एका खेडेगांवचा रहाणारा. त्या वर्षी आमच्या गांवाला पुष्कळ दुष्काळ पडला होता. पोटासाठीं माणसें चरफडत मरत होतीं. त्या दुष्काळांत माझींही मुलें नाहींशीं झालीं. माझी बायको चोरांच्या टोळीनें पळवली. मला भयंकर चीड आली व बायकोला शोधण्याच्या इराद्यानें मीं नानातऱ्हेचे वेष पालटून चोरांच्या टोळीला मिळालों. परमेश्वरानं माझी ही इच्छा लौकरच पुरी केली. एक दिवस मी चोरी करून ठरलेल्या ठिकाणीं सर्वांच्या आधींच जाऊन बसलों. त्या दिवशीं बरंच घबाड माझ्या हातीं आलं होतं, त्याच आनंदांत मीं होतों. म्हणून शांतपणें जरासा आडवा झालों. तोंच मला हळूच कोणीं हांक मारली. आवाज ओळखीचा वाटला, म्हणून मी इकडे तिकडे पाहूं लागलों. तोंच एका झाडा-पाठीमागून मला कोणीतरी हाक मारीत असावं असं वाटलं. मी त्या दिशेनें गेलों, तर माझी कारभारीणच समोर उभी. ती स्फुंदून स्फुंदून रडूं लागली. ती म्हणाली, ‘ चला लवकर, आपण पळून जाऊं.’ मी आढेवेढे न घेतां आम्हीं दोघांनीं धूम ठोकली. आम्ही किती पळालों तें कांहींच समजलें नाहीं. पण पाय फारच थकले, म्हणून विसांवा घेण्याकरितां एका धर्मशाळेंत थांबलों. पण तिथेंही आमचं दैव फिरलं. पुन्हां कारभारणीची व माझी ताटातूट झाली. त्या गांवांत पाटलाच्या घरीं चोरी झाली होती. माझ्यावर चोरीचा आरोप आला व माझा संशय घेऊन त्यांनीं मला अटक केली व कैदेंत टाकलें.

तें गांव संस्थानपैकीं होतें. नवीन कैदी आला कीं पहिल्यानें राणीसाहेबांच्याकडे घेऊन जाण्याचा रिवाज होता. त्याप्रमाणें मला नेण्यांत आलें. मी त्या वेळेस उमेदवार होतों. माझ्या अंगांत बाणेदारपणा होता. राणीनें मला नीट न्याहाळून घेतलें आणि हुकूम दिला, ‘ याला राजवाड्यांतल्या खोलींत घालून कुलूप घाला.’ आणि दिवाणजीला जवळ हांक मारून कायसंसं सांगितलं व त्याप्रमाणें मला ठेवण्यांत आलें. कुलूप लावीत असतां दिवाणजी

मला म्हणाले, " लेकाचं नशीब चांगलं दिसतंय. चांगला फायदा करून घे."

बाहेरून कुलूप घालून दिवाणजी निघून गेले. मी विचार करीत बसलों. थोड्या वेळानें मला जेवण आलें. मी जेवायचं नाकारलं व जेवण परत पाठवून दिलं. मी माझ्या आयुष्याचा विचार करूं लागलों. पोरांचीं प्रेतें मला आठवलीं. त्यांची भुकेनें कशी जीभ बाहेर आली होती तें आठवून मला भडभडून आलं. बायकोची काय वाट झाली असेल म्हणून मी रडूं लागलों. रडतां रडतां मला झोंप लागली. झोंप कसली? पळून श्रम झालेले, त्यांतच पोटांत कांहीं नाहीं, त्यामुळं ग्लानि आली असावी. मध्यरात्रीचा सुमार असेल. राणीसाहेब खोलींत आल्या, व त्यांनीं मला जागं केलं. मी खडबडून उठून बसलों. त्यांनीं आपला बुरखा काढला. मीं माझा बिछाना झाडून त्यांना बसण्याकरितां दिला. त्यावर त्या बसून म्हणाल्या, 'तूं मोठा हुषार दिसतोस. तुला बायकापोरें नाहींत वाटतं.' पोरांचें नांव काढतांच माझ्या डोळ्यांत पाणी उभें राहिलें. मी म्हटलें 'बायको होती, पण आतां ती कुठें आहे कुणाला माहीत?'

"ठीक आहे. तुझ्या चेहऱ्यावरून तूं खरा गुन्हेगार दिसत नाहींस. मीं तुला सोडून देतं, पण एका अटीवर—"

मीं म्हटलं " कुठलीका अट असेना, आपल्या इच्छेबाहेर मी नाहीं."

" ठीक आहे. ये तर माझ्या मागोमाग."

त्यांनीं मला कुठं नेलं तें समजलं नाहीं, कारण माझे डोळे बांधले होते. इच्छित स्थळीं गेल्यावर त्यांनीं मला मोटारींत बसवलं. बराच वेळ मोटार चालत होती. त्यावरून आपण बरेच लांब आलों आहोंत हें मला समजलें. मोटार थांबली. त्यांनीं मला हाताला धरून नेलं. तीन जिने चढून आम्ही वर गेलों. त्यांनीं दिव्याचा प्रकाश केला व माझे डोळे सोडले. तोंच पलंगावर एक सुंदर २५

वर्षांची तरुण बाई मृतवत् पडलेली दिसली. " हं, ही पाहिलीस माझी हाडवैरीण ? हिला पेटारांत घाल. मी तुला नगराबाहेर सोडतें. तिथून पुढें तूं थेट मुंबईला जा व समुद्रकिनारीं हें प्रेत ठेव. तुझ्या पाठीवर माझा मनुष्य आहेच. हिला ज्युहूला ठेवली पाहिजे. तसं नच झालं तर प्राणावर बेतेल. हं, हें घे कामागिरीचं बक्षीस."

माझं डोकं चक्कर खाऊं लागलं. तिनें माझ्या गालावर अशी चापट मारली. ' अरे, भितोस कां ? पुढच्या प्रसंगाला मी आहें ना ! आम्ही राजेलोक वाटेल तितके खून पचवितों."

मी त्या बाईला पेटारांत घालून सीलबंद केली आणि डोक्यावर घालून राणीच्या मागोमाग मोटारीत बसलों. छाती धडधडत होती. उजेडांत एके ठिकाणीं मोटार उभी राहिली. मोटार उभी राहतांच एक काळीकभिन्न थेरडी पुढें आली. मला उतरण्यास सांगितलें. मी उतरून म्हातारीच्या मागोमाग गेलों. तिनं मला चहा दिला. मी बाहेर पडलों, तों माझा एक सोबती तुमच्या शेजारीं रहात होता, तो भेटला. त्याच्या घरीं गेलों. माझं बावरलेलं चित्त त्याच्या ध्यानांत आलं. तो मला म्हणाला, " लेका भिम्या, किती धिम्मा झालास ? गोदीवरलं तुझं बरळणं, लावण्या कुठं गेल्या ? अगदीं नवऱ्यासारखं करतोस !"

' मला काम आहे, मी रात्रीं येईन ' असं सांगून मी बाहेर पडलों, तों म्हातारीच्या घरीं आलों. तिनं स्वैपाक तयार केला होता. मी जेवायला बसलों. पण छे, जेवण कुठलं जायला ? मीं ताटांतच हात धुतला. रात्र झाली. मीं पेटारा उचलूं लागलों, पण म्हातारी मला हात लावूं देईना. ती म्हणाली, ' तूं बाहेर जाऊन आलास. कुठं कांहींतरी सांगितलं असशील. त्यामुळें आमच्या राणीसाहेबांच्यावर भयंकर प्रसंग ओढवेल. तसं नाहीं. तुलाच पोलिसच्या ताब्यांत देतें. तूं कोणी चोर आहेस. मला संशय आल्यामुळें मीं तुला बसवून घेतलं आहे."

लगेच तिनं कांहींतरी लिहिलं व तें कुत्र्याच्या गळ्यांत बांधून

त्याच्या त्या भाषेंत त्याला सांगून त्याला पाठवलं. मीही धाडस केलं, आणि म्हातारीचा डोळा चुकवून निघून जाण्याचं ठरवलं. एकदां वाटे पेटारा नेऊं नये. पण राणीला आपण आपलं खरं नांव सांगितलं होतं आणि मला पकडून नेलं तेव्हां माझा फोटो काढला होता. तेव्हां पेटारा समुद्रांतच टाकून द्यावा हा निश्चय कायम करून मी त्या संधीची वाट पहात बसलों. इतक्यांत म्हातारी शौचास गेली. मी पेटारा उचलला आणि चालूं लागलों. एक टॅक्सी बोलावली व पेटारा आंत ठेवून स्वस्थ बसलों. ज्युहूला मोटारींतून आलों. ड्रायव्हरला विचारलं, ' कितना बजा ? '

" शेट, १२।। बज गये. "

मी इकडे तिकडे पहात झपझप चालूं लागलों व पटदिशीं पेटारा समुद्रांत टाकला. मोठा आवाज झाला. माझ्या अंगावर पाणी आलें. मी परत फिरलों. तों कांहीं पोलिस ड्रायव्हरजवळ चौकशी करीत होते. मी दिशा बदलून कांहीं वेळ सावकाश चालत होतों. पण पाठीमागें गलबला ऐकून धूम ठोकली. तोंच तुमच्या चाळींत आलों. पण माझ्या मित्राच्या दाराला कुलूप पाहून माझा धीर खचला. इतक्यांत पोलीस येतील या भीतीनें मी गडबडून गेलों. तुमचं दार उघडं दिसलं. भीतीनें आंत शिरलों. दार लावून घेतलं. तुम्ही धैर्याच्याच म्हणून माझं रक्षण केलंत. त्या वेळेस मी तुम्हांला सांगितलं कीं, माझ्यावर खुनाचा आरोप आहे. आपण मला युक्ति सांगितलीत आणि स्वैपाकिणीचा वेष देऊन पाठवलंत. पोलिसाच्या समोरून मी निर्धास्तपणें बाहेर आलों. तोंच इथं आलों. अरे, पण आलंच कीं माथेरान. केव्हां वेळ गेला तें समजलं नाहीं. बरं चला, तुम्हांला कुठं जायचंय ?

मी विचारांत पडलें.

"बरं चला. आधीं आमच्या घरीं चला. माझी कारभारीण आहे, ती कशी मला मिळाली तें सांगतों."

मींही त्याच्या घरीं जायचं कबूल केलं. चोराच्या तावडींत

सांपडलेली व धर्मशाळेंत नाहींशी झालेली बाई, पुन्हा नवऱ्याला कशी मिळाली? अशा धैर्यवान स्त्रिया आमच्या समाजांत आहेत म्हणायच्या! मला त्या बाईला पहाण्याची आतुरता उत्पन्न झाली. मी त्याच्याच हॉटेलमध्यें उतरलें. आंत गेल्यावर भीमजीनें 'सगुणे,' म्हणून हांक मारली. सगुणा हसतमुखानें बाहेर आली. ती इतकी देखणी होती कीं, एखादी राणी शोभली असती. तिच्या अंगावर काळं लुगडं खुलून दिसत होतं.

"भीमजी, ही तुमची बायको वाटतं."

सगुणेनं असा गोड मुरका मारला. भीमजी म्हणाला, "हिला चोरांनीं पळविली. चोर पळवतील नाहींतर काय? हिला दागिनें घालायला हवेत पाटीभर."

सगुणा भिवया चढवून जरा दटावीत भीमजीला म्हणाली' "काय पहा बोलण्याची तऱ्हा! कोंबडं म्हणतं पाटल्या करा आणि चिमणी म्हणते बिलवर भरा. लगीन झाल्यापासून हा दागिना एकटा म्हणजे डोरलं, दुसरं कांहीं नाहीं."

भीमजी म्हणाला, 'तुला हवेत कशाला दागिने? देवानंच दिलें आहे निसर्गतः सौंदर्य. हाच खरा दागिना."

सगुणा नाक फुगवून झणकाऱ्यानें म्हणाली, "पुरे झालं! असं म्हणून दोनदां वाईट प्रसंग माझ्यावर आले" मला हसूं आलं ह्या दोघांच्या संवादाचें. त्यांतल्या त्यांत सगुणेचं. तिच्या चेहऱ्यावर निरनिराळ्या तऱ्हेचे मोहक हावभाव होत असलेले पाहून मला फार गंमत वाटली. मीं म्हटलं, 'सगुणाबाई, तुम्ही फार चतुर दिसतां. तुमच्यासारख्या तेजस्वी स्त्रियाच राष्ट्राचं रक्षण करतील. पुरुषांनाही माना खालीं घालायला लावल्यात.'

मला मध्येंच थांबवून भीमजी म्हणाला, "अहो पण हिचा खरा मुत्सद्दीपणा अजून ऐकायचा आहे. आतां असं करूं या; अग ए, गरम गरम चहा आण जरासा. तो चहा घ्या. स्नान वगैरे आटपा आणि मग जेवण करीत हिचा डांबिसपणा ऐका. अग जा कीं."

"त्यो काय आला. मीं आधींच सांगितला होता स्पेशल करायला."

आम्हीं तिघांनीं चहा घेतला. मग मी शौचाला गेलें. आपण एकांतांत असलों कीं आपलं मन आपल्याजवळच असतं. नाना विचारांनीं तें आपल्याला भंडावून सोडतं. मीं ठरवलं, भीमजीला प्रभाकराचा पत्ता काढायाला सांगावा आणि सगुणेचं शौर्य आपणच ऐकावं. बायका पुरुषांच्यामागें जशा मोकळेपणानें बोलतात, तशा कांहींतरी गोष्टी त्यांच्या समोर असतांना लपवून ठेवतात. मी शौचाहून आलें. माझ्या स्नानाची व्यवस्था सगुणेनं केलेली दिसली मीं स्नान केलं. अकरावा अध्याय म्हणत वेणी आटपली. शिवलीलामृतामधील ११ अध्याय म्हणायचा माझा परिपाठ असे. पण तो आज मला आठवेना. मनुष्याच्या आयुष्यांत असे खडतर प्रसंग येऊं लागले म्हणजे विस्मृति होते. जेवणाची व्यवस्था टेबलावर केली होती. मीं खुर्चीवर बसत विचारलं, 'हें काय? तुम्हांला जेवायचं नाहीं?'

"नाहीं. आम्हांला आज उपोषण आहे."

"वा! अगदीं बरेच धार्मिक आहांत. बरं मग असं करा. माझं जेवण आटपेपर्यंत तुम्ही एक कामगिरी करून या. प्रो. चिमटे यांचा तपास काढून या आणि त्यांची भेटण्याची वेळ कोणची हेंही नक्की विचारून या."

'ठीक आहे' असं म्हणून भीमजी बाहेर गेला. मीं सगुणाबाईंना विचारलं, 'तुम्ही चोरांच्या हातून सुरक्षित कशा बाहेर पडलांत? सगुणाबाई, तुम्हांला देवाची शपथ आहे. अगदीं खरं खरं सांगा. मला तुमच्या या हकीकतीचा उपयोग होईल. बायकांना हृदय मोकळं करायला एक आईचं ठिकाण, दुसर मित्राचं ठिकाण. मी तुमची मैत्रीण झालें आहे."

सगुणा माझ्याकडे पहात दुःखानें म्हणाली, "काय करायचं बाई! पतीचं बळ नसल्याकारणानें मी लहानपणापासूनच धीट. लहानपणींच आईबाप वारले. मी वयांत आलें तोंच सासू वारली. झालं. हे रात्रंदिवस तालमींतच गुंग. काय बी होऊ, लक्षच द्यायचं

नाहीं. एकदां आमच्या घरीं चोर आले. तेव्हां तर मीं भिरच्यांच्या पोत्यावर घासलेट ओतून दिलं पेटवून. गेले मेले जळून ! आतां मी सुरक्षित कशी सुटलें तें सांगतें. चोरांचा नायक जो होता तो आमच्या देशमुखांचा मुलगा. त्याच्याबरोबर माझं लगीन ठरलं होतं. पण तो उनाड होता, म्हणून 'तसल्या मुलाला मी माझी मुलगी देणार नाहीं, त्याच्यापेक्षां विहिरींत ढकलून देईन.' असं माझ्या आईनं वडिलांना सांगितलं. तेव्हापासून त्याचा माझ्यावर डोळा होता. त्यानं मला पळवून नेलं, तं एका गुहेंत ठेवलं. तो दोन दिवसांनीं आला व म्हणाला, सगुणे, माझ्याशीं म्होतुर लाव. मी होय म्हणतांच त्याला फार आनंद झाला. तो म्हणाला, 'तुझा माझ्यावर जीव आहे ?' मी म्हणालें, "होय. मीं तुझा फार शोध केला. शेवटीं कंटाळून तुझा नाद सोडून दिला. भिमाजीला मी फार कंटाळलें. आणखीन जर तुझी गांठ पडली नसती तर मी जीव देणार होतें." माझ्या या शब्दांनीं हुरळून जाऊन तो म्हणाला, 'मी तुला बेशुद्ध केलें, त्यामुळें तुला त्रास झाला असेल.' तो माझं कपाळ चेपीत म्हणाला.

मी त्याचा हात हळूंच काढून म्हणालें, "म्होतुर झाल्यावर मी तुझी. आज नाहीं. पण तूं मला बेशुद्ध केलंस म्हणजे काय केलंस ?"

त्यानं आपल्या खिशांतून बाटली काढून मला दाखवली. तो म्हणाला, "या बाटलींतलं औषध हुंगलं म्हणजे माणूस बेशुद्ध होतं आणि पोटांत दिलं म्हणजे मरतं."

इतक्यांत शिटीचा आवाज झाला, म्हणून तो गडबडीनें बाहेर गेला. माझ्या हातांत बाटली तशीच राहिली. मीं विचार केला, आपण हें औषध घेऊन मरून जावं. पण नंतर विचार केला, जशास तसें. चोरावर मोर व्हावें. पुढें तो बरेच दिवसांनीं आला. मीं त्याचें हंसत हंसत स्वागत केलें. तो म्हणाला, 'सगुणे, आपला म्होतुर लवकर उरकला पाहिजे. कारण भिम्या आमच्या टोळीला येऊन मिळाला आहे. उद्यांच निघून शेजारच्या गांवीं जाऊन

येऊं बार उरकून. पण तुला दाखवायचं तसंच राह्यलं बघ. दागिने अगदीं पिवळे जरद."

ते दागिने पाहतांच ते मीं भराभर अंगावर चढाविले व त्याला म्हणालें, मी आतां कशी दिसतें सांगा पाहूं.

"थांब, उद्यां सांगतों कशी दिसतेस ती."

मीं नुसताच आव आणून म्हणालें, "मला काय तुम्ही खाणार होय! माझ्या हातचा स्वैपाक तर खाऊन बघा."

"मग येऊं आज रात्रीं? पण उशीर होईल. बारा तरी वाजतील. जाऊं मी?"

मीं जा म्हटलें. तो गेला. मी एकच पदार्थ चांगला करून त्यांत तें औषध घालून ठेवलें. तो जेवायला आला. बरोबर त्यानं बाटली आणली होती व थोडेंसें पिऊन आला होता. तो जेवायला बसला. अर्धें जेवण होत आलें, तोंच तो पेंगूं लागला. शेवटीं तर अगदीं आडवाच झाला. माझं काम झालं. चटकन मी गुहेच्या बाहेर पडलें. तोंच यांची सावली मला दिसली. मीं त्यांना हळूच हांक मारली. तेच असले तर आवाज ओळखून इकडे येतील. दुसराच कुणी असला तर पळून जाईल. पण देवाला माझी करुणा आली. मला जें पाहिजे होतं तें मिळालं."

इतक्यांत भीमजी आला. त्यानं प्रभाकराच्या भेटीची वेळ सांगितली. मी लगेच हात धुतला आणि भीमजीबरोबर प्रभाकराच्या घरीं गेलें. त्याचं घर जवळच होतं. प्रभाकराला जरा डोळ लागला होता. मी खुर्चीवर हळूच बसलें आणि भीमजीला जायला सांगितलं व म्हटलें, मी संध्याकाळीं आलें तर घरीं येईन. पण माझी वाट पाहूं नका!

भीमजी गेला. मी वेळ जाण्याकरितां टेबलावरचीं पुस्तकें चाळूं लागलें. एक उघडंच पत्र पडलं होतं.

"ता. क. पुरुषजात स्वार्थी, गळेकापू आहे. पुरुषाविना स्त्रियांना

या जगांत जगतां येत नाहीं हे तुमचे शब्द पटण्याकरितां मी जात आहें. आच्छा. गुड्बाय्. —कलावती. "

प्रभाकराची चळवळ पाहून मीं पत्र परत ठेवून दिलें आणि प्रभाकराला हांक मारली. तो खडबडून जागा झाला. ' तुमची झोंप मोडली हं. पण प्रभाकर, तुमचे डोळे सुजले कशानं? जागरण झालं होतं काय?"

"तसं कांहीं नाहीं. पण माझ्या सबंध आयुष्यभर जागरणच रहाणार." आणि चूळ भरण्याकरितां तो मोरींत गेला. मी पत्राकडे पाहिलं आणि सर्व ताडलं. समाधानाचा सुस्कारा सोडला. मनांत मीं म्हटलं, ' परमेश्वराची लीला अगाध आहे.' इतक्यांत प्रभाकर तोंड धुवून आला. त्यानं मला विचारलें, ' तुम्ही केव्हां आलांत? कुठें उतरलांत?' नंतर त्यानें चहा मागविला आणि पूर्ववत् बसला. त्याचं मन अस्वस्थ दिसत होतें. दुःखाश्रूंनीं डोळे भरून येत होते. थोडा वेळ आम्ही दोघें गप्प बसलों. चहा आला. त्यांनीं थोडा चहा घेतला व मीं थोडा घेतला.

"प्रभाकर, तुम्ही अस्वस्थ दिसतां. त्याचं खरं कारण माझ्या लक्षांत आलं आहे. पण ईश्वर सर्व करतो तें बऱ्याकरितांच करतो. आपले कुणाचे काय लागेबांधे असतात ते माणसाला कळत नाहींत. पण अंतःकरणाला बरोबर समजतात. कला ही तुमची बहीण आहे. असे दचकूं नका. मी विचारतें त्याचीं उत्तरें द्या. तुमची आई जिवंत होती कां मेली होती हें तुम्हांला माहीत आहे का? ती मुंबईला वेश्या झाली आहे."

प्रभाकराच्या कपाळावरील आठ्या पाहून मीं पुढें बोलूं का नको याचा विचार करूं लागलें. पण बोलायचंच असं ठरवून मीं पुढें म्हणालें, "प्रभाकर, जन्मदात्रीबद्दल तिरस्काराचं बोलणं तुम्हांला शोभत नाहीं. पण तें असो. पण ती मेली आहे, तिचीच मुलगी कला. हें पत्र वाचा म्हणजे समजेल." मीं त्याच्या हातांत तें पत्र दिलं. प्रभाकर पत्र वाचूं लागला. त्याच्या चेहऱ्यावर होणाऱ्या

भावनांनीं मला समाधान होत होतं. पत्र वाचून समाधानाचा सुस्कारा त्यानें सोडला व तो मला म्हणाला, "चला, आपण थोडेसे फिरायला जाऊं." मग आम्ही चालत चालत फिरायला गेलों. वाटेनें आम्ही बऱ्याच विषयांवर गप्पा मारल्या. माझे पाय बरेच थकल्यामुळें आम्ही एका टेकडीवर विसाव्याकरितां बसलों. प्रभाकर म्हणाला, " तुम्हीं जी निर्वाणीची भाषा बोललांत, ती काय सिंधू नाहींशी झाली म्हणून ? "

मी म्हणालें, "छे हो. नुसती नाहींशी झाली म्हणून नव्हे, तर ती या दोन दिवसांत परलोकीं गेल्याचा मला सारखा भास होतो आहे. पण मला त्याचं कांहींच वाटत नाहीं. फक्त हृदय कष्टी होतें. आणि कर्तव्याला बांधलेलें मन प्रेमाचे पाश तोडीत पुढें जातें. जगच्चालक परमेश्वरानं या सृष्टीची रचना केल्यापासून प्रत्येकाच्या मागें हा नियम लावून दिला आहे. जगांत जी वस्तू निर्माण झाली ती भर-भराटीस चढली कीं तिचा नाश झालाच म्हणून समजा. प्रत्येकानें सूक्ष्म विचार करुन पाहिलं म्हणजे त्याला असें दिसून येईल कीं, प्रथम मनुष्याची उत्पत्ति होते. पुढें यौवनदशा प्राप्त होते. पुढें आपल्या कुटुंबाची सुखवृद्धि व देशाची सेवा होते. आणि ती पूर्ण झाली नाहीं तोंच सर्व गोष्टींचा व्याप सोडून परलोकचा मार्ग त्यास धरावा लागतो. तसंच प्रभाकर, माझं झालं आहे. बरं, चल आतां, अंधार पडूं लागला; आणि तो भीमजी मला जेवायला बोलवायला येईल. त्या दोघां नवराबायकोंना शनिवार असतो. "

प्रभाकर म्हणाला, "पण हा भिमजी कोण ? आणि त्याची अन् तुमची ओळख कुठें झाली ? "

मी म्हणालें, "अरे बाबा, ती एक मोठी गंमतीची हकीगत आहे. तो एक भयंकर माणूस आणि त्याची बायको म्हणजे महाधाडसी असून चतुर स्त्री आहे." इतक्यांत आम्ही बोलत बोलत मुक्कामीं येऊन थडकलों. " पण तुम्ही आज नाहीं गेलांत तर नाहीं कां

चालणार ? " असें प्रभाकरानें केविलवाणें विचारलें. मी म्हणालें, " हरकत नाहीं. पण त्याला तूं तसं कळवलं पाहिजेस. " पडत्या फळाची आज्ञा घेऊन प्रभाकर ताबडतोब भीमजीला कळवायला निघून गेला. जातां जातां प्रभाकर मला म्हणाला, " मला ८–८॥ होतील, तोंपर्यंत तुम्ही कांहींतरी वाचीत बसा." तो निघून गेल्यावर मी त्याच्याच वाटेकडे कितीतरी वेळ पहात बसलें. माझ्या नकळत माझ्या मनांत एक विचार येऊन गेला. मीं म्हटलं, ' मला अगदीं मुलगा शोभण्यासारखाच हा आहे. माझ्या विचाराला याच्या विचाराची बांधणी किती सुसंगत आहे ? सिंधूचे जर विचार असे असते, तर माझ्यासारखी धन्य माता मीच होय. ' विचार करीतच मी टेबलाजवळ असलेल्या खुर्चीवर बसलें. टेबलावर पडलेल्या वर्तमानपत्राकडे माझी शून्य दृष्टि लागली. तोंच माझ्या पोटांत कालवाकालव होऊं लागली. छाती धडधडूं लागली. नजर अधीर झाली. मीं एक वर्तमानपत्र उचललें. माझे हात थरथर कांपत होते. मीं भराभर सगळीं वर्तमानपत्रं बाजूला केलीं. डोकं भरभर फिरत होतं. सभोवतालीं खोली सुद्धां गरगर फिरत आहे, असा भास मला होई. मी तशीच धडपडत उठलें व कॉटवर धाडदिशीं अंग टाकलें ! कां, कोण जाणे, माझं हृदय रडूं लागलं. एक मोठी किंकाळी माझ्या कानांवर आदळली. " आई ग ऽ अग ऽ आई ऽ " ही किंकाळी माझे काळजाचे पडदे फाडून निघाली. तो आवाज माझ्या सिंधूचाच होता. मी खडबडून उठून बसलें. माझी भिरभिरणारी नजर सगळ्या घरभर फिरली, तोंच क्षणापूर्वी फेकून दिलेल्या वर्तमानपत्रावर गेली. मोठ्या अक्षरांत " अपघात कीं आत्महत्या ! " हें लिहिलेलें माझ्या दृष्टीस पडलें. मी तें वर्तमानपत्र चटकन उचलून घेतलें व उघडून पाहूं लागलें. तों छिन्नविछिन्न झालेलं चित्र पाहून एकदम घाबरून गेलें. एक मोठी किंकाळी फोडली. मी बेशुद्ध पडलें.

जागी झालें, तेव्हां सकाळचे ९॥ चा सुमार होता. मी डोळे

उघडून इकडे तिकडे पाहिलें; तर प्रभाकर माझ्या डोक्यावर पाण्याच्या पट्ट्या ठेवीत बसला आहे, भीमजी व त्याची बायको जवळ बसली आहेत. मी डोळे पूर्णपणें उघडतांच भीमजी म्हणाला, " ताई, काय हें दुबळ्यासारखं ? " मला भीमजीचं बोलणं मुळींच आवडलं नाहीं. मी म्हणालें, भीमजी, मी दुबळी आहें असं तुम्हां सर्वांना वाटतं ? पण नाहीं ! मी दुबळी नाहीं. माझ्या दुःखाचीच कल्पना कुणाला नाहीं. गेल्या अडीच वर्षांत क्षणक्षण मी दुःखाच्या डोहांत पोहलें आहे. सिंधूला स्वतंत्र करावं ही माझी आकांक्षा. आतां तीच आकांक्षा जळून खाक झाली. माझ्या बुद्धिमत्तेचं सामर्थ्य नष्ट झालं. आयुष्यभर मी दुःखाच्या भोंवर्तांच फिरत राहिलें. देवानं माझ्या आयुष्याचा कधीं विचार केला आहे काय ? जिच्यासाठीं मी आजपर्यंत मोहाच्या मृगजळापासून दूर राहिलें, ती माझी सिंधू ऽ "

मला रडे आवरेना. मनस्तापामुळें अंगांत ताप बराच चढला. प्रभाकर भीमजीला म्हणाला, "डॉक्टरला घेऊन यावं. ताप कांहीं कमी होत नाहीं." भीमजी उठून गेला. मीं म्हटलें, " डॉक्टरला आणूं नका. तोही स्वार्थी आहे. मनुष्याचा प्राण गेला तरी तो ' व्हिजिट फी ' मागण्यास कमी करीत नाहीं. हें जग स्वार्थानें भरलें आहे. हेंच मी सिंधूला आजपर्यंत सांगत आलें. पण..."

" होय आई; आणि तें मीं ऐकलं नाहीं त्याचं प्रायश्चित घेण्यासाठींच मी तुझ्या पायाशीं धांवत आलें. "

" कोण ? सिंधु—माझी सिंधू ? " मला खरंच वाटेना. मी पटकन तिला मिठी मारली.

" आई, मी कालच मुंबईस आलें. कुळंबिणीनं सांगितलं, तूं माथेरानला गेलीस. मग तशीच मी इकडे आलें. गार्डांतच माझी एक कॉलेजमैत्रिण भेटली. तिचे वडील डॉक्टर दिवाकर, त्यांच्याकडे एक गृहस्थ तुझी हकीकत सांगत होते. मी त्यांना हॉटेलचं नांव

विचारलं आणि तडक इकडे पळतच सुटलें! आई, मला क्षमा कर."

" ऊठ बाळ. मी तुला कोण क्षमा करणार? आयुष्यभर देहाला निरर्थक कष्ट दिल्यामुळें आतां माझ्या देहांतला कणनूकण विसाव्या-साठीं व्याकुळ झाला आहे. परमेश्वरा, माझ्याकडे......"

" आई, आई, नको ग असं बोलूंस! माझ्याकरतां तरी तुला आतां जगलं पाहिजे. आई, माझ्या असहाय स्थितींतच......"

" सिंधू, काय तूं...हाय रे दैवा!"

सिंधू माझ्या अंगावर पडून कितीतरी वेळ रडत होती. मीं वर पाहिलें. प्रभाकरही रडत होता. त्याच्या तोंडून अस्पष्ट उद्गार बाहेर पडले 'अपघात कीं आत्महत्त्या?'

" आत्महत्या मुळींच नाहीं. शक्यच नाही तें. माझ्या देहाचा गालिचा पसरून त्यावर माझ्या भावी तान्हुल्याला मी निजवीन आणि मातृपद कायम राखीन! माझ्यासारख्या असह्य दुःखांतील कुमारिकांना व विधवांना या सैतानरूपी पुरुषांपासून दूर करीन. विधवाविवाहमंडळ स्थापन करून प्रौढबालिकाविवाह बंद व्हावेत म्हणून मुलींच्या पालकांना विनंती करीन आणि या नरकयातनांतून दुःखी भगिनींची सुटका करीन अशी मी या पवित्र मातेच्या चरणीं हात ठेवून शपथ घेतें." सिंधू निश्चयानें बोलत होती. प्रभाकर तटस्थ वृत्तीनें सिंधूकडे पाहात होता. मी सिंधूकडे पाहून पुन्हां प्रभाकराकडे पाहिलं. प्रभाकराला मीं जवळ बोलाविलं. आणि टेबलावर जी माझी पिशवी होती ती मीं सिंधूला आणा-वयास सांगितली. त्यांतलं लिहिलेलं एक पॅड तिच्या हातीं देत मीं म्हटलं, 'पुढील मजकूर नंतर लिही आणि या पत्त्यावर पोष्टांत टाक, आणि सिंधू, माझी......शेवटची इच्छा......"

" सांग, सांग; अशी घोटाळूं नकोस!"

" मातृसेवा हेंच माझं सर्वस्व " सिंधूच्या तोंडून नकळतच शब्द उमटले.

" प्रभाकर, सिंधू इतकी निवळलेली पाहून मला समाधान वाटलं. सिंधू, पुरुषावांचून स्त्रियांचं जीवन नीरस असतं. तसंच प्रभाकर, स्त्रियांवांचून घर नाहीं, मुलांवांचून समाधान नाहीं. प्रभाकर, आपण सुशिक्षित आहांत. सुविद्य आहांत. जास्त काय सांगू ? माझ्यानं बोलवत नाहीं. प्र – भा ऽ कर, सिंधू ऽ ऽ दे ऽ ऽ व तु ऽ म्हां स ...... "

हाय ! सिंधूची आई तिला सोडून गेली. सिंधूची मायेची सावली दुरावली ! अशा परिस्थितींतच सिंधूला एका अर्भकाला जन्म द्यावा लागला.

---